पुणें विद्यापीठ

प्राचीन मराठी गद्य–पद्य–माला : २



रामकवि–कृत

# भा षा प्र का श

संपादक

शं. गो. तुळपुळे
मराठी विभाग, पुणें विद्यापीठ

मूल्य : पांच रुपये

१९६२

# अनुक्रमणिका


| | पृष्ठें |
|---|---|
| निवेदन ... ... ... | |
| प्रस्तावना ... ... ... | १–३७ |
| विषयानुक्रम ... ... ... | ३९ |
| भाषाप्रकाश ... ... ... | १–११४ |
| शब्द-सूचि ... ... ... | १–६६ |
| शुद्धिपत्र ... ... ... | ६७–६८ |

# प्रस्तावना

## प्राचीन मराठी कोशवाङ्मय

कोश-रचना भारतीयांना प्राचीन काळापासून परिचित आहे. संस्कृत भाषेत आजपावेतों विविध विषयांचा समावेश होणारे अनेक कोश तयार झाले आहेत. 'महाराष्ट्र-शब्दकोशा'च्या पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत अशा २२८ कोशांची नामावलि दिलेली आहे. हे सर्वच कोश प्रकाशित झाले आहेत असें नाही; किंबहुना, यांतील कांहींचीं हस्तलिखितेंहि उपलब्ध झालेलीं नाहीत. तथापि कोश-वाङ्मया-संबंधीं प्राचीन लेखकांना किती आस्था होती हें स्पष्ट होण्यास वरील नामावलि उपयोगी पडेल. संस्कृत भाषेचा शब्दसंग्रह, तिच्या व्याकरणाचा सांगाडा आणि त्या भाषेंतील पुराणकथा व तत्त्वज्ञान या सर्वांचा वारसा मराठीने घेतला; परंतु त्या भाषेंतील कोश-वाङ्मयाच्या प्रचंड सामग्रीकडे मात्र मराठीने बहुंशीं पाठ फिरविलेली दिसते.

बहुंशीं म्हणण्याचें कारण म्हणजे कै. राजवाडे यांच्यापासून आजपर्यंतच्या संशोधकांच्या दृष्टीस पडलेले किंवा पूर्ण-अपूर्ण स्थितींत हातीं लागलेले प्राचीन मराठींतील कांही कोश हें होय. या कोशांची संख्या हाताच्या बोटांवर मोजण्या-इतकीच असून त्यांचे विषय संस्कृत भाषेंतील कोशांप्रमाणें अनेकविध नसून त्यांमध्यें अत्यंत मर्यादित विषयांचा प्रपंच केलेला आहे. साधारणपणें संशोधकांनाच परिचित असलेल्या या प्राचीन मराठी कोशांपैकी कांहींचा उल्लेख पुढे केला आहे.

(१) धुळें येथील श्रीसमर्थ–वाग्देवतामंदिरांत 'ज्ञानेश्वरी शब्दपर्याय', 'ज्ञानेश्वरी परिभाषा' या नांवांचे ज्ञानेश्वरींतील कठिण शब्दांचे अर्थ देणारे कोश हस्तलिखित स्वरूपांत आहेत. (बाडांक : १६, ५५८, १७०३)¶

(२) वरील संग्रहांतच 'विवेकसिंधूची परिभाषा' म्हणून एक शब्दकोश आहे. (बाडांक १०४५)¶

(३) नगर प्रांतीं मिळालेला एक ज्ञानेश्वरीचा शब्दार्थकोश पुणें विद्यापीठाच्या हस्तलिखित-संग्रहांत आहे (क्र. २४५). त्यांतील नोंदी पुढील पद्धतीच्या आहेत :—

---

¶ १. श्रीरामदासी संशोधन, खं. १–२. पैकी बाडांक ५५८ मधील प्रत संपूर्ण असून 'ती अवश्य प्रकाशित व्हावी' असा अभिप्राय कै. शं. श्री. देव यांनी देऊन ठेवला आहे.

प्रौढी : थोरपन । समाजीं : सत्तेमध्यें ।
माहेरें : मायबाप । सिनलें : पिकलें ।
चोज : विप्रीत । ...।

( ४ ) कै. राजवाडे यांनी एका 'ज्ञानेश्वरीकोशा'चा उल्लेख केला आहे.* या कोशांत ज्ञानेश्वरींतील 'दुर्बोध म्हणजे मध्यकालीन शब्दांचे अकारविल्ह्यानें अर्वाचीन मराठी प्रतिशब्द दिले आहेत. हा कोश सुमारें तीनशें वर्षांचा जुना असून, हा दोनचार स्थळीं ह्याहून प्राचीन मराठी कोशांचा हवाला देतो.' या कोशांतील प्राचीन मराठी कोशांचा हा उल्लेख खरा असावा असें मानण्याचें एक प्रमाण म्हणून राजवाडे यांनीं नंदर्गीकर-संपादित 'रघुवंशा'च्या प्रस्तावनेंतील हेमाद्रीच्या टीकेचा निर्देश केला आहे. या टीकेंत हेमाद्रि कित्येक संस्कृत शब्दांना तत्कालीन मराठी प्रतिशब्द देतो, त्या अर्थी शके १११० च्या सुमारास संस्कृत-मराठी असे द्वैभाषिक कोश रचण्याकडे विद्वानांची प्रवृत्ति होत होती असें राजवाडे यांना वाटतें.

( ५ ) नांदेड येथील 'गोदातीर इतिहास संशोधन मंडळा'च्या संग्रहीं ज्ञानेश्वरीचा एक जुना शब्दकोश आहे.§

( ६ ) प्रा. भगवंत देशमुख यांनी 'एकनाथकृत ज्ञानेश्वरी-परिभाषा' उजेडांत आणली असून¶ तिचें कर्तृत्व पैठणकर एकनाथांकडेच जाते किंवा काय याविषयीं मात्र संशय वाटतो. या 'परिभाषे'चा नमुना पुढे दिला आहे:—

**अध्याय पहिला** ( पुढील आंकडे ओव्यांचे आहेत )

"रहंवर ॥ रथश्रेष्ठ ॥ १३९ ॥ बंबाळ ॥ समुदाय ॥ १४५ ॥ विसनला ॥ वोसणला ॥ १४८ ॥ आंतक ॥ येम ॥ गजबजिला ॥ भिउनि राहिला ॥ आसुडत ॥ हलत ॥ १५६ ॥ मोकळवादि ॥ स्थानत्याग ॥ १५७ ॥ आदिपुरुष ॥ भगवंत ॥ १५८ ॥ घंटाआंत ॥ समुदायांत ॥ १६२ ॥ येकवटले ॥ उठावले ॥ दंडि ॥ दोर्दंडि ॥ १६५ ॥ वांदिवां ॥ पुरुषार्थ ॥ १७२ ॥ पाडेविण ॥ योग्यतेविण ॥ १८७ ॥...॥"

वरील कोश अपूर्ण स्थितींत मिळालेला आहे.

( ७ ) ज्ञानेश्वरीप्रमाणें महानुभावीय अभ्यासकांनीहि पूर्वसूरींचे ग्रंथ समजण्यास सोपे जावे या हेतूने त्या ग्रंथांवर अर्थस्पष्टीकरणात्मक टीपा लिहिल्या आहेत. हें

---

* राजवाडे लेखसंग्रह, भा. २, पृ. ७५.
§ प्रतिष्ठान, ६. १ ( सप्टेंबर १९५८ ).
¶ प्रतिष्ठान, ६.३ ( नोव्हेंबर, १९५८ ).

साहित्य ' टीप ' किंवा ' टीपग्रंथ ' या नांवाने प्रसिद्ध आहे. महानुभाव पंथांतील असाच एक मध्यकालीन मराठी कोश कै. वि. का. राजवाडे यांच्या पाहण्यांत होता.† हा कोश गद्य असून त्यांतील शब्दार्थ सुबोध असल्याचें ते सांगतात. बहुधा हा टीपग्रंथाच्या स्वरूपाचा असावा. अशा प्रकारचे अनेक टीपग्रंथ उपलब्ध असल्याने महानुभाव पंथीयांनी केलेल्या शब्दार्थविषयक साहित्यरचनेचा परिचय याहून अधिक प्रमाणांत करुन घेणें शक्य आहे.

( ८ ) तंजावर येथील ' सरस्वती महाल ' ग्रंथालयांत प्रस्तुत ' भाषाप्रकाश '-शिवाय आणखी एका शब्दकोशाचें हस्तलिखित असून त्या कोशाचें नांव 'अकारादि प्राकृत भाषेचा निघंट्ट ' असें आहे.¶ त्याचा कर्ता कोणी काळेराव आप्पा हा असून त्याचा रचनाकाल अज्ञात आहे. या कोशाचीं एकूण १२५ पत्रें, किंवा २५० पृष्ठें असून प्रत्येक पृष्ठावर सुमारें ४० शब्दांच्या नोंदी आहेत. म्हणजे या मराठी ' निघंट्ट ' मध्यें सुमारें १०,००० शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. त्यांत काही फारसी शब्दहि आहेत. या कोशाचा कर्ता तंजावर प्रांतीं राहणारा दिसतो. कारण शब्दार्थ देतांना त्याने ' झप्प ' (= गुच्छ ), ' झरांटा ' ( = इंगित ), ' कुंटें ' ( = तळें ), ' उदंड ' ( = पुष्कळ ) इत्यादि खास तंजावरी मराठींतील शब्दांचा वापर सढळपणें केलेला आढळतो. या कोशाची कल्पना यावी म्हणून त्यांतील नोंदींचा नमुना पुढे दिला आहे :

**नकटा**– ( १ ) नाक नाहीं तो; ( २ ) पावसाळा दिसवगेचा एकाजिनसीं दोळ्यास ( द्राविडींत तट्टापूंची मणताती ).

**नांगी**– ( १ ) विंचाची पुंस; ( २ ) शराचें शेंडें.

**पिसा**–वेडा ( तिलंगी शब्द ).

**मोमई**– तुरुकस्तानी वोखद.

**वय**– जाल्या आयुष्याचे कोळाची गणना.

**हंडा**– थोर तप्पेलें.

**हरबरा**– चणा; द्राविडींत कडलें मणताति ते दाणे.

**हौद**– लहान कुंटें.

---

† ' राष्ट्रीय मराठी कोश ' ( सरस्वती–मंदिर, श्रावण शके १८२७ ).

¶ Descriptive Catalogue of Marathi MSS. in the T.M.S.S.M. Library, Tanjore, No. 1869.

## महानुभावीयांची शब्दार्थपरीक्षा

महाराष्ट्रांत शब्द व त्याचा अर्थ यांविषयीं महानुभाव पंथाच्या लेखकांनी विशेष आस्था दाखविलेली दिसते. या दृष्टीने 'लक्षणरत्नाकर' हा यादवकालांत पंडित आनेराज व्यास यांनी रचिलेला अर्थनिर्णयशास्त्रावरील संस्कृत प्रबंध उल्लेखनीय आहे.§ हा प्रबंध संस्कृत भाषेत असला तरी त्यामागील हेतु चक्रधरांच्या वाणींतून निघालेलीं व म्हाइंभटाच्या 'लीळाचरित्रां'त सूत्ररूपाने आलेलीं वचनें पंथीयांना स्पष्टपणें कळावीं हा आहे. तसेंच या संस्कृत ग्रंथावरील 'बत्तीस लक्षणाची टीप', 'द्वात्रिंशल्लक्षणटीका' व 'बालबोधिनी' या तीनहि टीपा मराठी भाषेत आहेत. पैकी 'बत्तीस लक्षणाची टीप' या ग्रंथांतून प्रारंभींचा एक उतारा पुढे दिला आहे. 'लक्षणरत्नाकरां'तील 'सूत्र' या पदाच्या व्याख्येचा † अर्थ प्रस्तुत टीपकार पुढीलप्रमाणें सांगतो—

"थोडीं अक्षरें असौनि बहुतां अर्थातें निवेंदी तें अल्पाक्षर : यथा : सर्वकर्ता' तो : एकुचि शब्द अनेकार्थीं प्रवर्तला असतां उपयोग्य अर्थाचें प्रकाशक तें असंदिग्ध : यथा सत् शब्द साधुवाचक आणि विद्यमानावाचक आणि प्रशस्तावाचक : आणि पूज्यावाचक आणि ब्रह्मावाचक" (पृ. १)

वरील टीपग्रंथ चक्रधरांचीं सकृद्दर्शनीं संदिग्ध व क्वचित् परस्परविरोधी भासणारीं सूत्रबद्ध वचनें सुसंगतपणें लावून त्यांचा अर्थ उलगडण्याच्या कामीं बहुमोल आहे यांत शंकाच नाही. त्यांत दिलेलीं अर्थनिर्णयाचीं 'बत्तीस लक्षणें' प्रथम स्वतः चक्रधरांनीच मराठी भाषेत सांगितलेलीं होतीं या गोष्टीसहि महत्त्व आहे. या बाबतींत 'अन्वयस्थळ' कार म्हणतात, ‡ "बत्तीस लक्षणें : गोसावीं महाराष्ट्रभाषा म्हाइंभटाप्रति निरूपिलीं होतीं : तियें (आनोबासीं) संस्कृतें केलीं." सारांश, आनेराजांच्या प्रस्तुत संस्कृत प्रबंधाचें बीज चक्रधरांच्या मराठींत असून त्या बीजाचा विस्तारहि वरील टीपग्रंथांच्या द्वारां मराठींतच झालेला आहे.

परंतु हें सर्व खरें असलें तरी 'बत्तीस लक्षणांची टीप' म्हणजे कांही शब्दकोश नव्हे. त्यासाठी महानुभावांच्या टीपग्रंथांकडे वळलें पाहिजे. हे टीपग्रंथ

---

§ संपा० ह. ना. नेने (नागपूर, १९३७).

† अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद् विश्वतोमुखम्।
अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः॥ (ल. र., २)

‡ भा. इ. सं. मं., त्रैमासिक, १७. २.

महानुभाव पंथांतील ' साती ग्रंथां ' वर असून ते एकूण सात असल्याचें डॉ. देशपांडे सांगतात. † त्यांपैकी विश्वनाथ बीडकर, भीष्माचार्य व चाहेव्यास बागडे, आणि विनायकव्यास तळेगांवकरांचे शिष्य यांचे तीन स्वतंत्र टीपग्रंथ असल्याचें कळतें. याशिवाय अनंतमुनि चोरयाचक यांची ' साती ग्रंथां ' वर तिसरी शोधनीची टीप आहे, हरींद्रमुनि पुसदेकर यांची पांचवी टीप आहे, व दत्तराज मराठे कवीश्वर यांची सहावी टीप आहे. यांपैकी पहिले तीन टीपग्रंथ सोडून बाकीचे ' शोधनी ' टीपग्रंथ म्हणून समजले जातात. एकानें लिहिलेल्या टीपेचा आधार घेऊन दुसरा टीपकार जी विस्तृत टीप लिहितो ती शोधनीची टीप. अशा रीतीने दत्तराज मराठे यांची शेवटची शोधनीची टीप ठरते. या दत्तराजांनी ' साती ग्रंथां 'तील कठिण शब्दांचा एक कोश रचिला असल्याचें डॉ. देशपांडे ‡ अन्यत्र सांगतात. तो वरील टीपग्रंथाच्या स्वरूपाचाच असावा.

महानुभावांच्या या टीपग्रंथांची कल्पना द्यावी म्हणून नारो बहाळिये-कृत ' ऋद्धिपुरवर्णनां ' तील दोन ओव्यांवरील टीप पुढे दिली आहे. मूळ ओव्या अशा आहेत—

कीं देवांचा प्रासादु गहनु । भणौनि माथां वाहाति स्थानु ।
अंगीकृत तमोगुणु । निरसावेया ॥ ३५२ ॥
कीं आत्मजाची थोरी । देखौनि सौरस भीतरीं ।
आपण तटस्थ द्वारीं । पातले ते ॥ ३५३ ॥

टीप —

" प्रासाद=राजमठ । गहन=अंतररहीत । माथां=मस्तकीं । वाहाति=धारिला । स्थानु=खांब; दाहावा रुद्र । आंगिकृत तमगुण=तेणें जडत्वीं भोगाचें कर्म-लेप तें । निरसावया=नासावया, महेशें आपुला क्रोध नासावेया । दोनिरूपें=स्त्री-पुरुष ऐसीं धरिलीं ॥ ३५२ ॥

आत्मज=नृसिंह तो खांबांतून उद्भवला यदर्थी आत्मज । थोरी=प्रतिष्ठा । सौरसु= अष्टभावीं पूजन देखौनि तेणें साश्चर्यत्वें तटस्थ होओनि उभे ठेले अथवा ते खांब होओनि श्री-प्रभुचा सहवास घडावेया महाभीतरीं आले ॥ ३५३ ॥ "

वरील टीपग्रंथ केवळ कोशात्मक नसून स्पष्टीकरणात्मकहि आहेत हें वरील उताऱ्यांतील ' सौरसु ' या शब्दावरील टीप वाचून लक्षांत येईल. परंतु महानुभाव ग्रंथकारांचें लक्ष शब्दार्थाकडे कसें व किती होतें तें त्यांच्या ' साती ग्रंथां ' वरील ' टीप ' सांगते यांत कांही शंका नाही.

---

† श्रीऋद्धिपूरवर्णन, प्रस्तावना, पृ. ४०.

‡ महानुभावीय मराठी वाङ्मय ( द्वितीयावृत्ति ), पृ. ५१.

## प्रस्तुत ‘ भाषाप्रकाश ’ ग्रंथ व त्याचा कर्ता

येथवर ज्या प्राचीन मराठी कोशांचा परिचय करून दिला त्या सर्वांचें स्वरूप साधारणपणें सारखें आहे. हे सर्व कोश गद्यांत असून ज्ञानेश्वरीसारख्या किंवा महानुभावांच्या ‘ साती ग्रंथां ’ सारख्या विशिष्ट वाङ्मयीन कृतींतील कठिण शब्दांचा अर्थ स्पष्ट करणें हा त्यांच्या रचनेमागील हेतु आहे. म्हणजेच हे सर्व कोश अर्थनिर्णायक स्वरूपाचे आहेत.

वरील कोशांहून सर्वस्वीं निराळा असा एक मराठीचा शब्दकोश येथे प्रथमच प्रसिद्ध होत आहे. या कोशाचें नांव ‘ भाषाप्रकाश ’ असें असून तो तंजावर येथील सरस्वती-महाल ग्रंथालयात हस्तलिखित स्वरूपांत उपलब्ध झाला आहे. ¶ एका दृष्टीने मराठींतील कोशवाङ्मयांत प्रस्तुत कोशाचें स्थान एकमेवाद्वितीय आहे असें म्हणतां येईल. या व तंजावर येथेच मिळालेल्या आणखी एका अशा दोन शब्दकोशांचा परिचय आम्हीं पूर्वी अन्यत्र करून दिला होता. ‡ त्यांपैकी प्रस्तुत ‘ भाषाप्रकाश ’ या कोशग्रंथाचा कर्ता ‘ रामकवि ’ हा असून त्याने आपल्या नांवाचा उल्लेख पुढीलप्रमाणें दोन ठिकाणीं केला आहे :—

**( १ ) कोळे नृसिंव्हदेवाचा दास राम कवी म्हणे ॥**

( प्रार्थनावर्ग, १·१२ )

**( २ ) श्रीनृसिंव्हानुचर रामकविविरचित भाषाप्रकाशे...... ॥**

( नानार्थवर्ग, समाप्ति )

वरील उल्लेखांतील ‘ नृसिंव्ह ’ हें पद द्व्यर्थी आहे. कारण नृसिंह हें जसें या ग्रंथकाराचें दैवत आहे, तसेंच तें त्यांच्या गुरूचेंहि नांव आहे असें पुढील उल्लेखांवरून दिसतें. ग्रंथारंभींच्या नमनांत त्याने आपल्या सद्‌गुरूचा स्पष्टच नाम-निर्देश केला आहे. तेथे तो म्हणतो—

**गणाधिपति वाग्देवी सद्‌गुरु श्रीनृसिंव्हजी.**

( प्रार्थनावर्ग, १·१ )

ग्रंथारंभींचा ‘श्रीलक्ष्मीनृसिंव्हाय नमः’ हा उल्लेख उघडच दैवतविषयक आहे. हें दैवत कोळे या गांवांतील असल्यामुळें त्याचा निर्देश ग्रंथकार, कर्नाटकांतील

---

¶ Descriptive Catalogue of Marathi MSS. in the T.M.S. S.M. Library, Tanjore, No. 1870.

‡ Journal of the Tanjore Sarasvati Mahal Library, Vol X, No. 2, pp. 1–8.

पद्धतीला अनुसरून ‘ कोळे नृसिंव्हदेव ’ असा करतो. तात्पर्य, नृसिंह हें राम-कवीच्या दैवताचें व तसेंच गुरूचेंहि नांव आहे.

याशिवाय अन्य स्वतःविषयी कोणतीहि माहिती कोशकाराने दिलेली नाही. कुलवृत्तांत, शिक्षण, व्यवसाय इ० सर्व गोष्टींविषयीं त्याने मौन स्वीकारलें आहे. कोशांतील एका उल्लेखावरून त्याचें वास्तव्य कांहीं काळ कर्नाटक प्रांतांत झालेलें असावें असें दिसतें. तो म्हणतो,

‘ कर्नाटकीं निवसलों नेणताही असो परी ।’
( प्रार्थनावर्ग, १. ११ )

त्याच्या कोशामध्यें कानडी शब्दांचें वैपुल्य आढळतें, यावरून वरील उल्लेखाला दुजोरा मिळतो. वास्तव्य कर्नाटकांत होऊनहि कोशकाराची भाषा मराठी असल्याने त्याचें ज्ञानेश्वरीचें वाचन चांगलें असावें असें कोशामधील पुढील उल्लेखावरून वाटतें :

“ ज्ञानेश्वर्यादिकाधारें वदतों स्वल्पही बहु ।” ( १.१२ )

## कोशाचें स्वरूप

प्रस्तुत कोशाला ‘ भाषाप्रकाश ’ हें नांव स्वतः कोशकारानेच दिलेलें आहे. आरंभींच्या प्रार्थनावर्गांत कोशनामाचा निर्देश दोन ठिकाणीं येतो—

१. भाषाप्रकाशनामें महाराष्ट्र कोश आरंभ ।
२. भाषाप्रकाश म्हणुनी या ग्रंथा नांव ठेविलें ।

हा कोश धार्मिक स्वरूपाचा नाही. त्यामुळे भाविक व मुमुक्षु श्रोत्यांपुढे अध्यात्मविद्येचें निरूपण करणाऱ्या ज्ञानेश्वरीप्रमाणें या कोशाचें लेखन होणें संभवनीय वाटत नाही. तथापि जिज्ञासु श्रोत्यांसाठी या कोशाची रचना झालेली असणें शक्य वाटतें. या दृष्टीने प्रार्थनावर्गांतच येणाऱ्या, “ त्या रूपेंचि तुम्ही **श्रोते** अर्पितों तुमचें तुम्हां ” ( १.९ ) या चरणांतील ‘ श्रोते ’ हा शब्द विशेष महत्त्वाचा आहे. परंतु कोश-रचनेविषयीं याहून अधिक माहिती इतरत्र आढळत नसल्याने त्यासंबंधीं निश्चितपणें कांही निष्कर्ष काढतां येणार नाही.

शब्दांचा संग्रह करणें हा मुख्य हेतु असल्याने कोशकाराला अनेक ग्रंथांचें वाचन करणें अवश्य ठरतें. परंतु या बाबतींतहि प्रस्तुत कोशामध्यें एकाच ग्रंथाचा नामनिर्देश आहे. तो म्हणजे ज्ञानेश्वरीचा. ‘ ज्ञानेश्वर्यादिक ’ यांतील ‘ आदिक ’ म्हणजे कोणते ग्रंथ तें कोशांत कोठेहि सांगितलेलें नाही. हा कोश पद्यबद्ध असून तो अनुष्टुभ् छंदांत रचिलेला आहे.

## कोशाचा रचनाकाल व -स्थल

रामकवीने आपला ' भाषाप्रकाश ' निश्चितपणें केव्हा व कोठें रचिला तें कळण्यास कांहीं मार्ग नाहीं. कारण त्याच्या रचनेच्या स्थलकालाविषयीं स्वतः ग्रंथकार कांहींहि सांगत नाही. रचनास्थल तंजावर किंवा तंजावरच्या आसपासचें एखादें गांव असावें असें ग्रंथाचें उपलब्धिस्थळ, ग्रंथांत आढळणारें द्राविडी शब्दांचें वैपुल्य, आपण कर्नाटकनिवासी असल्याचें स्वतः ग्रंथकाराचें निवेदन व हा कोश आपण ' देशांतरींच्या देशस्थां ' साठी रचीत आहों हें त्याचें म्हणणें, इतक्या चार गोष्टींवरून वाटतें. तंजावर प्रांतांतील मराठी कवींनी केलेली विपुल व विविध ग्रंथ-रचना लक्षांत घेतल्यास वरील अनुमानास बळकटी येते. स्वतः ग्रंथकाराच्या गुरुचें ' कोळे ' हें स्थानहि त्याचें तंजावर प्रांतांतील वास्तव्यंच सुचवितें. कोशाच्या रचनाकालाविषयीं इत्यतहि अनुमान करतां येत नाही. फार तर त्याची रचना १८ व्या शतकाच्या अखेरीस किंवा १९ व्या शतकाच्या प्रारंभीं झाली असावी असें म्हणतां येईल. असें म्हणण्यास एक पुरावा या कोशांत आहे. ' नानार्थवर्गा ' त ' बावन ' या शब्दाविषयीं लिहितांना कोशकार म्हणतो,

बावन्नंवणी सोनें ह्मणिजे त्यासि बावन ।

(९·२८३)

वरील चरणांतील ' बावन्नंवणी ' हें सोन्याचें विशेषण महत्त्वाचें आहे. या सामासिक शब्दाची फोड बावन् + नंबरी अशी केल्यास ' नंवणी ' हा ' नंबरी ' या अर्धांग्ल शब्दाचा ( इं. Number ) अपभ्रंश दिसतो. वरील समास साधण्यांतहि पुनः भेसळ झालेली आहे. कारण मराठीच्या दृष्टीनें 'बावनकशी सोनें' असा वाक्प्रचार रुढ असून तोच इंग्रजीच्या दृष्टीने ' शंभर नंबरी सोनें ' असा आहे. तेव्हां मराठी ' बावन ' व इंग्रजी ' नंबरी ' या दोन शब्दांची व कल्पनांची भेसळ करून कोशकाराने ' बावन्नंवणी ' असा नवीन शब्द बनविलेला दिसतो. वरील व्युत्पत्ति बरोबर असेल तर या अर्धांग्ल सामासिक शब्दामुळे प्रस्तुत कोश अव्वल इंग्रजीच्या काळांत, म्हणजे १९ व्या शतकाच्या आरंभीं रचला गेला असें सिद्ध होतें.

## कांहीं रचनाविशेष

प्रस्तुत कोशाची विभागणी एकूण तेवीस वर्गांमध्ये केलेली आहे. पहिला ' प्रार्थनावर्ग ' प्रास्ताविक स्वरूपाचा असून प्रत्यक्ष शब्दसंग्रहास प्रारंभ दुसऱ्या वर्गा-पासून झाला आहे. बहुतेक वर्गांच्या आरंभीं त्या त्या वर्गांतील विषय-सूचक उल्लेख आहे. उदा०, ' दानवर्ग आरंभ ', ' वाग्वर्ग आरंभ ' इ० वर्गसमाप्तिहि याचप्रमाणें

उल्लेख करून केलेली आहे. उदा०, ' अंगवर्ग समाप्त ', ' नानार्थवर्ग समाप्त ' इ० कांही वर्गारंभीं वर्ग–विषयाचा उल्लेख न करतांना कोशरचनेला प्रारंभ केला आहे ( उदा०, वर्ग २ व १९ ). त्याचप्रमाणें अनेक ठिकाणीं वर्गसमाप्तिहि केवळ संख्या–लेखनानेच केलेली आहे. ( उदा०, ' इति वर्ग १३ समाप्त '; ' इति वर्ग १४ समाप्त ' इ० ). या ठिकाणीं वर्ग–विषयाचा उल्लेख गाळलेला आहे.

वर्गांतील शब्दनोंदणी झाल्यानंतर मागाहून आठवलेल्या शब्दांचा समावेश करण्यासाठी कोशकाराला क्वचित् प्रसंगीं ' पुरवणी 'हि जोडावी लागली आहे ( उदा० वर्ग ५ वा ).

रासकवीचा हा ' भाषाप्रकाश ' पद्यबद्ध असला तरी त्याची रचना बरीच शिथिल वाटते. साधा अनुष्टुभ् छंद योजिलेला असूनहि त्याची रचना निर्दोष उतरलेली नाही. छंददोष असंख्य आहेत. कदाचित् ग्रंथाचा विषय शब्दकोश किंवा शब्दसंग्रह हा असल्यामुळे निर्दोष पद्यरचना करणें शक्य झालें नसावें. तसेंच, ऱ्हस्वदीर्घविषयक अनियमिततांहि पुष्कळ प्रमाणांत आढळते. याचेंहि कारण या ग्रंथाचें स्वरूप हेंच असावें. शब्दसंग्रह व पद्यबद्धता हीं दोन्ही साधावीं हा हेतु असल्याने कोशकार व कवि या दोन भूमिका अनेक ठिकाणीं परस्परविरोधी झाल्या आहेत. अर्थात् पद्यबद्ध असला तरी शब्दकोश काव्यात्मकहि असेल अशी अपेक्षा कोणी करीत नाही, हें खरें. तथापि प्रस्तुत ' भाषाप्रकाशां 'तील कांही रचना अगदीच गद्य वाटते. उदाहरणार्थ, बोकडाची पुढील व्याख्या पाहावी—

सेळीच्या पुरुषा नांव बोकूड ह्मणिजेतसे।

( १२·१२ )

तसेंच ' उसें ' या शब्दाचें पुढील निर्वचन फारच व्यावहारिक वाटतें.

निजेलियांच्या मानेचें टेंकणें ह्मणिजे उसें। '

( १८·४७ )

परंतु अशीं ' गद्य ' स्थळें एकंदरींत अपवादात्मक आहेत. उलट कांही ठिकाणीं या कोशकारांतील कवि प्रगट झाल्याचा भास होतो. उदाहरणार्थ, पुढील व्याख्या पहा.

' सूर्याची अंतुरी छाया राणादेवी ह्मणोनि घे। '

( ८·६७ )

' चांद्राची अंतुरी जे ते चांदिणी तेच रोहिणी। '

( ८·९० )

'चांदणी चंद्रपत्नीही असमानगिरी तथा।'
(९.१३२)

'भरे सरे पाउसानें सवें जो रानकालवा।'
(१३.३)

'नदीनाहो समुद्र तो लहरी आणि लाट ते।'
(१३.१०)

'कौशल्य तें कुलकर्णी तेच चातुर्य बोलिजे।'
(२०.१६)

याप्रमाणें या कोशग्रंथांतहि मधूनच कांही काव्याचे पाझर दिसून येतात व त्यामुळे एरव्ही रूक्ष वाटणारा हा ग्रंथ थोडेंफार मनोरंजनहि करतो.

प्रत्यक्ष कोशरचनेंत मात्र शिथिलता, अव्यवस्थितपणा, पुनरुक्ति व क्वचित् दुर्बोधता यांसारखे दोष आढळतात. कोशकाराने कोशांतील शब्दांची मांडणी वर्गवारीने केलेली असली तरी ती बरीचशी स्थूलस्वरूपाची आहे, काटेकोर नाही. पुढे त्या त्या वर्गाचा परिचय करून घेतांना कोशांतील शब्दांच्या वर्गीकरणांत अव्याप्ति व अतिव्याप्ति यांसारखे दोष आपण पाहूंच. कोशरचनेंतील या शैथिल्यामुळे कांही शब्दांची अनेकदां पुनरुक्ति झालेली आढळते (उदा०, कडवे; घो; चवकी; तीर; पार; पाव्हेरें; वळसा; इ०). क्वचित् संपूर्ण चरणाचीहि पुनरुक्ति दिसून येते (उदा०, १४. २४; १५. २०).

तसेंच कांही ठिकाणीं रामकवीचा हा 'भाषाप्रकाश' दुर्बोधहि वाटतो. परंतु या ग्रंथाची मूळ प्रत उपलब्ध झालेली नसल्याने वरील दुर्बोधतेच्या दोषाचा धनी स्वतः कोशकार कीं त्याच्या ग्रंथाचा नकलकार तें सांगणें कठिण आहे. तथापि इतकें खरें, कीं कोशकाराने लेखनसमाप्तीनंतर कोशावरून सफाईचा हात फिरविलेला दिसत नाही. तसा तो फिरविता तर ह्या कोशांतील पुढील दुर्बोध स्थळांपैकी निदान कांही तरी सुबोध झालीं असतीं. यांपैकी कांही स्थळें अशीं :— ५. १३, ५५; ६. ३६; ८. ५, ८, १७; १०. ५, ६; १५. ४४; २३. ९.

## कोशाचें आगळेपण

रामकवीचा हा शब्दकोश वरील दोषांनी युक्त असला तरी मराठी कोशरचनेच्या इतिहासांत त्याचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे यांत संशय नाही. ज्ञानेश्वरीचें कांही जुने कोश व महानुभावीय 'साती ग्रंथां' ची 'टीप' सोडल्यास तंजावर प्रांतीं रचिलेला हा 'भाषाप्रकाश' म्हणजे मराठी भाषेचा पहिला कोश म्हणतां येईल. त्यांतील शब्दांचें वर्गीकरण तर्कशुद्ध नसेल, त्याची रचना थोडी शिथिल

असेल, किंवा त्यांत क्वचित् कोठे दुर्बोधत्व व पुनरुक्ति हीं आढळत असतील. परंतु या दोषांमुळें मराठीच्या या अमरकोशाचें महत्त्व यत्किंचितहि कमी होत नाही. सुमारें साडेचार हजार मराठी शब्दांचा विषयवारीनें संग्रह करणाऱ्या या कोशासारखा दुसरा मराठी कोश अद्यापि तरी प्रकाशित झालेला नाहीं. असें हें प्रशंसनीय काम करूनहि जुन्या प्राकृत कवींप्रमाणेंच कोशकाराची भूमिका अत्यंत नम्रतेची आहे. मराठी भाषासागरांतील कांहीं ' बिंदु ' च आपण विद्वज्जनांच्या पुढें ठेवीत आहों याची त्याला जाणीव आहे. आपला हा कोश म्हणजे 'बाळकाचे सावडे बोल' आहेत, किंवा ईश्वराला भक्तिभावानें वाहिलेलें ' तुळसीदळ ' आहे, अशा विनयानें रामकवि हा कोश सादर करीत आहे. या ग्रंथाचा उपयोग ' देशांतरींच्या देशस्थां 'ना स्मरणार्थ होईल ही कवीची अपेक्षा आहे. कोशासाठी ज्ञानेश्वरीचा आधार घेतल्याचा उल्लेख कवीनें केलेलाच आहे. ज्ञानेश्वरीच्या अनुकरणानें स्वतःविषयींची लीनता आणि समोर बसलेल्या श्रोतृवृंदाचा गौरव हीं वैशिष्ट्यें कवीच्या प्रास्ताविकांत दिसून येतात. तथापि आपल्या कोशाचें 'अपूर्वत्व' व्यक्त करून सांगण्याचा आत्मविश्वासहि त्याच्यापाशीं आहे. पूर्वीच्या काळांत कोश, काव्य, व्याकरण, टीका इ. ग्रंथ बहुत झाले असले तरी 'अर्थ खंडल्याचें' ( अर्थ स्पष्ट करून सांगण्याचें, अर्थाची फोड करण्याचें ) काम आपण करीत आहों, ही त्याची भूमिका आहे.

## कोशाचें हस्तलिखित

' भाषाप्रकाशा 'ची एकच हस्तलिखित प्रत तंजावर येथील सरस्वती-महालांत उपलब्ध झाली ( सूचि, क्र. १८७० ) व याच प्रतीवरून प्रस्तुतचें संपादन केलें आहे. ही प्रत मूळ लेखकाच्या हातची नसून तिची कोणी तरी केलेली नक्कल आहे. या प्रतीचा लेखक, लेखनकाल व लेखनस्थळ यांविषयीं प्रतींत एकहि उल्लेख नाही. या प्रतींत कांही लेखनदोष आहेत; परंतु अन्य प्रतीच्या अभावीं सध्या तरी हीच प्रमाण मानणें भाग आहे. या प्रतींत वर्गांना क्रमांक दिलेले असले तरी त्या त्या वर्गांतील द्विचरणी श्लोकांना अनुक्रमांक दिलेले नाहींत. तथापि कोशांतील शब्दाचा संदर्भ शोधणें सुलभ व्हावें यासाठी प्रस्तुत कोशाचें संपादन करताना त्यांतील श्लोकांना क्रमांक देण्यांत आले आहेत.

## कोशांतील शब्दसंग्रहाचा तपशील

या कोशाचे एकूण २३ वर्ग पाडण्यांत आलेले असून त्यांत आलेल्या शब्दसंग्रहाचा तपशील पुढीलप्रमाणें आहे :—

१. **प्रार्थना–वर्ग** : हा वर्ग प्रास्ताविक स्वरूपाचा असून त्यांत गणाधिप ति, वाग्देवी, लक्ष्मीनृसिंह, सद्गुरु नृसिंहजी, कवींद्र, विद्वज्जन, साधुजन व श्रोते

यांना नमन करून कोशकारानें प्रस्तुत ग्रंथरचनेचा हेतु स्पष्ट करून सांगितला आहे. 'महाराष्ट्र भाषाब्धि' अथांग असून त्याची 'पार खोली' जाणणें शक्य नसल्यामुळें आपण बिंदु-सिंधु किंवा बीज-वट न्यायानें संग्रहात्मक रीतीनें बोलत आहों असें तो म्हणतो. तसेंच 'देशांतरींच्या देशस्थां'ना 'स्मरणार्थ' उपयोगी पडावा हा हेतु या कोशरचनेच्या मागें असून या कामीं ज्ञानेश्वरादि ग्रंथांचा आधार घेतल्यानेंहि त्यानें सांगितलें आहे. आजवर 'कोश, काव्य, व्याकरण, टीका' इत्यादि विविध रचना होऊनहि 'अर्थ येकीं न खंडला' अशी वस्तुस्थिति असल्यानें आपण हा 'महाराष्ट्र भाषाकोश' रचण्यास प्रवृत्त झालों असें त्याचा कर्ता म्हणतो.

२. संकेत-वर्ग : हा वर्ग कोशांत योजिलेल्या संकेतांचें किंवा 'काव्यखुणां'चें स्पष्टीकरण करणारा आहे. शब्दकोशांत पुंसक, स्त्री व नपुंसक अशा तिन्ही लिंगांच्या संज्ञा येणार व त्यांचा त्याप्रमाणें प्रत्येक ठिकाणीं खुलासेवार निर्देश करणें शक्य नसल्यानें कोशकारानें 'छंदबंदा'ची सोय पाहून लिंगनिर्णयाचे कांहीं संकेत बसविले आहेत. उदा०,

'तो ते तें म्हणतां संज्ञा क्रमें पुं-स्त्री-नपुंसकीं'

(२·३)

'श्रीलिंग म्हणते ठाई त्रिक ऐसें प्रयोजिलें'

(२·१०)

या दुसऱ्या संकेताप्रमाणें 'झोपाळू, मुकाळू व मायाळू' हे शब्द 'त्रिक' म्हणजे तिन्ही लिंगी आहेत असें कोशकार सांगतो (२·१९). याशिवाय या वर्गांत शब्दांच्या अन्तीं येणाऱ्या निरनिराळ्या स्वरांवरूनहि त्या शब्दांची लिंग-व्यवस्था करण्याचा प्रयत्न त्यानें केला आहे. हे स्वर एकूण पंधरा असून त्यांवरून होणारा लिंगनिर्णय पुढीलप्रमाणें आहे:—

अ : दोर (पुं.); थार (स्त्री.); घर (नपुं.).
(आ)* : पारा (पुं.); बला (स्त्री.).
इ-ई : हत्ती (पुं.); विळी (स्त्री.); पाणी (नपुं.).
उ-ऊ‡ : गुरु, लाडू (पुं.); जळू, ऊ (स्त्री).

---

* 'आ' हा अन्त्य स्वर स्वतंत्रपणें निर्देशिलेला नाही.

‡ सर्व 'अ'कारान्त पुंलिंगी नामांना 'उ' जोडला जातो (उदा०, रामु) असें कोशकार सांगतो (२·२१).

ऊं : लेकरूं, पिल्लूं ( नपुं. ).
य–ये : न्याय ( पुं. ); मोय, सोये ( स्त्री. ).
ऐ– ( ए ) : हे, ते, दे, सवे, बाहे ( स्त्री. ).
यें– ( एं ) : जें, तें, में, हें ( नपुं. ).
ओ : घो, चो, लो, वल्हो ( पुं. ); बाइको ( स्त्री. ).
ऍं ( एं )¶ : खेडें, कुडें, घोडें ( नपुं. ).

वरील यादींत 'अं' व 'औं' हे दोन स्वर मिळवून अन्त्यस्वरांची संख्या एकूण १५ होते असें कोशकार म्हणतो. स्वरांचें वरील वर्गीकरण व मोजणी हीं उघडच सदोष आहेत. परंतु तीं करण्यांत कोशकाराचा मुख्य हेतु स्वरगणना हा नसून या पद्यबद्ध कोशांत योजिलेले संकेत स्पष्ट करणें हा असल्यामुळे त्याने केलेली वरील स्वरव्यवस्था याहून अधिक विचारांत घेण्याचें कारण नाही. या वर्गाच्या शेवटीं तो स्पष्टपणें म्हणतो,

येकून पंधरा ऐसे स्वर भाषा प्रकाशिते । §
व्याकर्णींचे भाव येथें लिंगें जाणों प्रकाशिले ॥ ३३ ॥
न सांगतां पष्ट लिंगें समजूं येत यामुळें ।
घाटीभंगाविना छंद घडाया पादपूरणीं ॥ ३४ ॥

शेवटीं 'ही' व 'कळो' हे अनुक्रमें 'आणीक' व 'जाणिजे' या शब्दांचे संकेत म्हणून आपण योजिले असल्याचें सांगून कवीने हा संकेतवर्ग संपविला आहे.

३. दान-वर्ग : या वर्गांत देण्याचे विविध प्रकार व तद्वाचक शब्द आलेले असून त्यांतील कांही उल्लेखनीय आहेत. उदा०, इच्छापूर्तीसाठी देणें तें 'भातुकें', जेवणासाठी देणें तो 'भत्ता' किंवा 'भाते', पोटासाठी ती 'पोटगी', गैरहिशेबी देणें ती 'फसकी', आरतीसाठी दिलेली ती 'घोवाळणी', मुंज्या मुलास घातलेली ती 'भिकाळ', होळीच्या थंडकीस दिलेले तें 'पोस्त', प्रवासांत शिदोरी म्हणून दिलेली ती 'बुत्ती', इत्यादि. वरील दानप्रकारांत द्रव्याबरोबर अन्नवस्त्रादि वस्तूंचाहि समावेश होतो.

---

¶ सानुनासिक (nasalised) स्वरांचा निर्देश कोशकाराने 'नाकें जनित' असा केला आहे.

§ येथे 'स्वर भाषाप्रकाशि ते' याप्रमाणें शब्द तोडून 'भाषाप्रकाश' हें ग्रंथनाम घेणेंहि शक्य आहे.

**४. शब्दादि–वर्ग :** या वर्गांत नाना प्रकारचे पशु, पक्षी, कीटक, मेघादि सृष्टवस्तु, दारूकामें, वाद्यें, चलनवलनादि क्रिया, यांचे ' अनुकाराचे शब्दसंघ ', म्हणजे ध्वनिवाचक शब्द दिले आहेत. पैकीं कांही मनोरंजक आहेत. उदा०, दारूकामांत हवायांची ' सरसर ', फटाक्यांची ' चट्फट ', फुलबाणांची ' भर्भराट ', चुचुंद्रीचा ' चुचुकार ', चक्रवाणांची ' गरगर ', आणि बंदुकांचा ' ठस्ठुस ' हे ध्वनिवाचक शब्द पहावे. वाद्यांत विणेचा ' झणत्कार ' किंवा ' तुं तुं ', तासाचा ' ढण्ढणा ', झल्लरीचा ' झण्झणाट ', टाळांचा ' टख्खणाकिट ', मृदंगाचा ' खण्खणाट ', दुंदुभीचा ' धों धों ', नागसरीचा म्हणजे पुंगीचा ' पुंई ', टिमकीचा ' टिंटिमा ', कर्ण्यांचा ' भों भों ', तुतारीचा ' तुं तुं ', व ढोलाचा ' ढुं ढुं ' याप्रमाणें विविध शब्द आले आहेत. कोशकाराचें पाहणें किती बारीक आहे याची साक्ष या वर्गांतील कांही नोंदीवरून मिळते. उदा०, एक वानरांचे तीन प्रकारचे ध्वनि त्याने टिपले आहेत. त्यांचा सामुदायिक ' किल्किलाट ', विरोधपर ' कीचकीच ', आणि गुरकावणीचा ' हुर्र ' हे ते तीन आवाज होत. याशिवाय कपींद्राचा ' भुभुकार ' निराळाच ! तसेंच सुण्याचे म्हणजे कुत्र्याच्या भुंकण्याचे ' वस्वस् ', ' वळवळू ' आणि ' कुइ ' असे विविध प्रकार कोशकार सांगतो. कोंबड्याचें त्रिकाळीं आरवणें म्हणजे मशिदींत मुलाण्याने नमाज पढण्यासाठी घातलेली ' बांक ' किंवा बांगच होय असें तो मानतो ( ८ ). विविध ध्वनींच्या पुढील नोंदी मनोरंजक वाटतील :—

> **शेळ्यांचे शब्द ते में में अंबे म्हणति वासुरें । ८**
> **मांजरीं गुर्गुरू म्याऊ शब्द कुर्कुर उंदिरीं । ९**
> **गरुडाचा शब्द जो तो कृष्णा म्हणुनि सांदतो । १०**
> **कांकणांचा कणत्शब्दु पादुकांचा चटक्फटक् । २४**

**५. वाग्वर्ग :** हा वर्ग बोलण्याचे नानाविध प्रकार सांगतो. आधीं 'बोलणें' या शब्दालाच वाचा, वैखरी, मात, गोष्टी, गोठी, बोली, भाक, भाष, भाख, बोल, कवळ, गिरा, जबा असे प्रतिशब्द कोशकाराने सांगितले आहेत ( २-४ ). पुढे बोलण्याचें खरें व खोटें असे दोन भेद करून पहिल्याला सत्य, साचार, साचोकार, सावाव, निरुतें, निकें, फुडें व यथार्थ, आणि दुसऱ्याला ' लबाड, लटिकें, वाव, असाचहि, असत्यहि ' असे प्रतिशब्द तो देतो ( ५-७ ). त्याने केलेल्या कांही व्याख्या उल्लेखनीय आहेत. उदा०, ' बोभाणें ' म्ह. घट्टी बोलणें, ' म्हणी ' म्ह. बोलायाची पद्धती ( १० ), ' अव्हासव्हा ' किंवा ' अडावेडा ' बोली म्ह. असंगत बोलणें ( १३ ), ' होड ' म्ह. प्रतिज्ञा-वाक्य किंवा ' शफत ' ( १६ ), ' बुझावणी ' म्ह. समजावणें ( २१ ), ' रळी ' म्ह. थट्टामस्करी ( २५ ), ' उडावणी ' म्ह. तुच्छोक्ति ( २६ ), ' चट गोष्टी ' किंवा ' चाट गोष्टी ' म्ह. टवाळ्या ( २७ ), ' वोसणणें ' म्ह. ' नीदवैखरी ' किंवा झोपेंतील बरळणें ( २८ ),

'काणोबाणो,' म्ह. कांहीच्या कांही बोलणें (३६), 'फांटा' म्ह. 'अंतीच्या भ्रांतीचा बोल' (५४), 'टाळोरा' म्ह. अपकीर्तीचा डंका (५५), 'निखंदणें' म्ह. टाकून बोलणें (५७), 'शिफारसी' म्ह. सहायोक्ति (५८), 'ठकठक' म्ह. कंटाळवाणा शब्द' इत्यादि. जगांत नकारघंटाच अधिक ऐकूं येते हें या कोशावरूनहि दिसतें. 'आस्तिक्यार्थी बोलणीं' आहे, आथी आणि असे या तीनच शब्दांनी व्यक्त होतात, तर 'नास्तिक्यार्थी' शब्द अनेक आहेत; उदा०, नसे, नाही, नाथि, नाट, नाटंटा, पूज्यभाव, नव्हे, नोव्हे, इत्यादि (४७, ४८). या वर्गाला एक लहानशी 'पुर्वणी' जोडून कोशकाराने तेलंगें, अरवें, तिगळें, कानडें, हिंदुस्थानी, रजपुती, गुजराती, यवनी, तुरुकाणी इ० 'जातिभाषां' ची नोंद केली आहे. या यादींत फिरंग्यांच्या भाषांचा उल्लेख नाही, याचें आश्चर्य वाटतें. मराठी भाषेचा निर्देश 'म्हराटें बोलणें' असा केलेला आहे.

६. **संख्या–वर्ग** : या वर्गात 'येक, दोन' इ० पूर्ण संख्यावाचक, 'पाव, अरधा, पाऊण, सव्वा, दीड, अडीच' इ० अपूर्ण संख्यावाचक, 'सव्वाई, तिजाई, चौथाई, आठोवा, दहिजा' इ० अंशवाचक व 'आदिलें, बिजें, तिजें, चहुथें' इ० क्रमवाचक शब्दांचे पर्याय दिले आहेत. त्याचबरोबर कांही समूहवाचक संख्यांचे शब्दपर्यायहि कोशकार देतो. उदा०, दोहींचा समुदाय 'दंद, जोडी, जुग, जावळें, दुल्हें' इ० शब्दांनी व तिहींचा समुदाय 'तिरुख व त्रिक' या शब्दांनी व्यक्त होतो असें तो सांगतो. या समूहवाचक संख्या सांगतांना त्याने क्वचित् 'च्यारींचा मेळ' म्हणजे 'चांपा' व 'पांचांचा मेळ' म्हणजे 'पंजा' अशा प्रकारचे श्लेषहि साधले आहेत (१३, १४). याच वर्गात सारुक्के, सरुगाणी, अधेला, पावला, अडका, पैका इ० नाणकवाचक व घडा, फल्मा, पातका, अड्डा इ० मापनवाचक शब्दहि आले आहेत.

७. **रूपादि–वर्ग** : या वर्गात शरिराचे निरनिराळे आकार, वर्ण, रूपें इत्यादींचे वाचक शब्द आले आहेत. पैकी 'निमासुर रूप' म्हणजे काय तें सांगतांना कोशकाराने पुढील कोटिक्रम केला आहेः–

'निमे असुरता जेणें रूप तेंचि निमासुर'

८. **काल–वर्ग** : या वर्गाचें स्वरूप कांहीसें संमिश्र आहे. कारण त्यांत 'निमिष्यापासुनी महाप्रळय'– काळापर्यंतचे विविध काळ व त्याबरोबरच सूर्य, चंद्र, तेज इ० वाचक, दीपप्रकारवाचक (उदा०, खंजीर, समई, ठाणवई, दिवी, दिवटी, पोत, इ०), व पाप–पुण्य, लाभ–हानि, आदि–अन्त इ० वाचक शब्दहि दिले आहेत. कालवाचक शब्द सांगतांना कोशकाराने अठरा पलकांची काष्टा, तीस काष्टांची कला, तीस कलांचा क्षण, बारा क्षणांचा मुहूर्त व पंधरा

मुहूर्तांचा दिवस, याप्रमाणें कांहीं कोष्टकेंहि दिलीं आहेत ( ३–५ ). कालदर्शकासाठीं तो 'पानवळें' व 'घडियाळें' असे दोन शब्द देतो. विविध काळांत उन्हाळा, पाउसाळा व हिवाळा हे ऋतुवाचक, फलकाळ, निष्फलकाळ, सुकाळ, दुकाळ, अकाळ.इ० कृषिविषयक, व पर्वकाळ आणि पुण्यकाळ हे धर्मविषयक शब्द येतात. कालवाचक अव्ययांत कोशकाराने तैं, तेधवां, जेधवां, येधवां, सवें, जंवरी, तंवरी, वेळोवेळा, वारंवार, वेगीं, लवलाहें, झडकरी, झणीं, अवसांत, अवचटें, येकसरीं, विळें, अझुणी.इ० अव्ययें उल्लेखिलीं आहेत ( ४६–५८ ). पुढे तेजाचे पर्यायशब्द सांगतांना त्याने सूर्यादि तारांचें तेज, नरवृक्षादिकांच्या मुखावरील तेज, शस्त्राचें तेज, रत्नादिकांचें तेज, इ० विविध तेजप्रकार निर्देशिले आहेत. तसेंच, शेवट किंवा अखेर ही कल्पना स्पष्ट करतांना नष्टी, तुटी, हाणी, घात, सातेरें, नाश, खेव, हराश, खप, खर्च, वेंच, सरणें, देवाज्ञा, मरण, अंत, अवसान, निमणें, निदान, निर्वाण, सेवट इत्यादि सूक्ष्म अर्थछटा दाखविणारे शब्द तो सांगतो ( १११–११५ ).

९. **नानार्थ–वर्ग** : या कोशांतील इतर सर्व वर्गांपेक्षा हा वर्ग फार निराळा आहे. इतर वर्गांतून एकाच शब्दाचे एक किंवा अनेक समानार्थी पर्यायशब्द ( Synonyms ) दिलेले आहेत; तर ह्या वर्गांत भिन्नार्थ असणारे परंतु सारखे दिसणारे शब्द ( homonyms ) आले आहेत. या शब्दप्रकारास कोशकार 'श्लेष' किंवा 'नानार्थपदपद्धती' म्हणतो ( १,६ ) व अशा प्रकारचे शब्द अकारविल्हाने देऊन त्या त्या वर्णाने प्रारंभ होणारे शब्द संपल्यानंतर 'इति अकारादि', 'इति कादि' याप्रमाणें समाप्तिदर्शक निर्देश त्याने केले आहेत. तसेंच, हा वर्ग आकारानेंहि इतर वर्गांच्या मानाने बराच मोठा असून त्याने या कोशाचा सुमारें एक-तृतीयांश भाग व्यापला आहे. 'काकु' अलंकाराच्या योजनेमुळे 'विपरीतार्थ' किंवा विरुद्धार्थ मनांत येऊन 'होयही नव्हे' होतें; म्हणून,

'संगतीयुक्त लागे तो अर्थ आदरिजे बुधीं।'

असें प्रारंभींच सांगून कोशकाराने पुढील भिन्नार्थवाचक शब्दावली दिली आहे. हे शब्द सुमारें पांचशें असून त्यांचें भिन्नार्थत्व स्पष्ट करण्यांत कवीचें कौशल्य दिसून येतें. उदा०, पुढील शब्दांवरील त्याची टीका पहावी :—

**अरती** ( १. रतिसुखाचा अनुभव नसलेली स्त्री; २. आरती ).
**अडकिता** ( १. 'पोफळखंडिता'; २. रोधिता; रोधणारा ).
**अडकणी** ( १. 'स्वयें गुंते दुज्या रोधी'; २. तंडुलार्थ ).
**अंगोठा** ( १. 'ठेवि अंगाची'; २. अंगठा ).

**आगर** ( १. पिकलेलें शेत; २. खाण ).

**इसाळ** ( १. ईर्षा; २. कामुक ब्रह्मराक्षस ).

**कांटाळा** ( १. रोमांच; २. तराजू ).

**किली** ( १. 'किलूपाचा हात'; २. वर्म ).

**गुढी** ( १. 'दूरील वृत्तांत'; २. 'पांडव्याची ध्वजा' ).

**टांक** ( १. होन–एक नाणें; २. 'प्रतिमालेखिनीमुख.' )

**दुकान** ( १. बाजार; २. दोन्ही कान ).

**धेंड–डा** ( १. वधूवरांचीं 'थोर नरवाहनें'; २. 'धियेचें अंड, म्हणिजे बुद्धीचें घर' ).

**नाचणी** ( १. राघी – एक धान्य; 'सुळी' – क०, वेश्या ).

**पोटागी** ( १. आस्था; २. पोटांतील आग ).

**पारसी** ( १. 'थोडसी अस्नात स्त्री'; २. 'यवनी लिपी' ).

**फांटा** ( १. 'लाकूड डाहाळी'; २. 'अंतिची भूलिची गिरा' ).

**माग** ( १. मार्ग; २. 'पावलाग,' – पावलांचा उगम; ३. 'कापडांचा प्रसव' ).

**मा** ( १. थोर; आधिक्य; २. आश्चर्य; तुच्छता ).

**वास** ( १. सुगंध; २. वसति; ३. भेटीची इच्छा; ४. 'अपेक्षेच्या पूर्तीची वाट पाहणें' ).*

**वऱ्हाड**– ( १. लग्न; २. लग्नाची 'मिर्वणी'; ३. 'शुष्कदेही'; ४. एका देशाचें नांव ).

**वेड**– ( १. वेडें; २. आस्था; ३. 'शिक्यारहित मुदी', म्ह. शिक्का नसलेली मुद्रा ).

**हियें** ( १. हृदय; २. 'आव्ह घालणें'; ३. 'धैर्य टाकणें' ).

या वर्गात कांहीं ठिकाणीं एका शब्दाचे अनेक अर्थ देतांना कोशकाराने श्लेष साधण्याचा प्रयत्न केला आहे, तर कांहीं ठिकाणीं कन्नड किंवा फारसीसारख्या परभाषेच्या आधाराने शब्दाचें अनेकार्थत्व व्यक्त केलें आहे. उदाहरणार्थ, पुढील व्याख्या पहाव्या :—

'**नाचणी** म्हणिजे राघी, सुळीचें नांव नाचणी।' ( २०७ )

क्वचित् शब्दाची फोड करून त्याचे अनेक अर्थ व्यक्त होतात. उदा.,

---

* 'वास पाणें किंवा पाहणें' हा वाक्प्रचार यादवकालीन महानुभावीय गद्यांत नेहमीं येतो.

‘ **अरिसा** शत्रुसा आणी **अरिसा** होय दर्पण । ’ ( ३० )
‘ **बावरी** म्हणिजे पेटी, **बा-वरी** पितयावरी । ’ ( २७६ )
‘ **ळुसें** बाळ ऐसेंही बाळाची पुण्ता तथा । ’ ( २७७ )

१०. **अंगवर्ग** :— या वर्गात मानवी शरीराच्या निरनिराळ्या अवयवांचे द्योतक शब्द आहेत. तपशिलांत जाण्याची कोशकाराची वृत्ति येथे दिसून येते. उदा., केशरचनेचे पुढील विविध प्रकार तो सांगतो :—

‘ शिंक्यापरी केशगुंफ गुंथा तो म्हणिजेतसे ॥
वेंठोनि खोवणें केस खोंपा तो बुचडा तथा ।
त्रिभागीं विणितां केस वेणी ते म्हणवोनि घे ॥
केसाचे बांधितां सेंडे सेंडी ते म्हणवीतसे ।
भलत्या बाजुचें अंग फरा तो म्हणवीतसे ॥

( ६६ ते ६८ )

या यादींत शरीराच्या गोपनीय अवयवांचे किंवा ‘ वस्त्राआडील वस्तुवां ’चे वाचक शब्दहि आहेत. परंतु ‘ जनामध्यें भंडवाणें बोलूं नये ’ असें म्हणून कोशकाराने हे शब्द ‘ अपसव्य ’ रीतीने, म्हणजे वर्णांच्या उलट्या क्रमाने, नोंदले आहेत ( ४ ते ९ ). त्याप्रमाणेंच ‘ बालसरस्वती ’ ची, म्हणजे मुलांच्या खेळण्यांतील बोलीची, नोंद करावयासहि तो विसरलेला नाही ( ५१ ते ५३ ).

११. **नरप्रकृतिवर्गः**— या वर्गात मनुष्यस्वभावाचे अनेक नमुने व्यक्त करणारे शब्द आले आहेत. उदा०, राजबिंडा, धींमा, दांडगा, गंव्हार, बापुडा, आज्ञाधार, बळियाडा, वांठ, इत्यादि. पैकी ‘ दांडग्या ’ ची पुढील व्याख्या उल्लेखनीय आहे :

‘ दांडगा जेथ सदट घो आणिक धटिंगण । ’ ( २ )

१२. **पक्षीखगमृगादि वर्ग** :— पशुपक्षादि प्राणिवाचक शब्द या वर्गात संग्रहित आहेत. पैकी घोडा या प्राण्याचे घोडा ( पुं. ), घोडी ( स्त्री. ) घोडें ( ‘सामुदाई नपुं.’ ), अडघोडें ( मध्यम आकाराचें घोडें ), टांकण ( गिड्डें व ‘चांग चालीचें ’ ) व तट्टू ( ‘ फेंगडें , भारवाही व गिड्डें ’ ) इतके प्रकार सांगितले आहेत. ‘ सेळीचा पुरुष ’ म्हणजे बोकड ही व्याख्या मनोरंजक आहे.

१३. **जलादि वर्ग** :—या वर्गाचें नांव कांहींसें अव्याप्त आहे. कारण त्यांत प्रारंभीं नाना प्रकारचे जलाशय, त्यांतील पाण्याचे धर्म, पाण्यावर उठणारे तरंग, त्यांतील भोंवरे इत्यादि जलविषयक शब्दांचा समावेश असला तरी शेवटीं

निरनिराळ्या वाद्यांचीं नांवें व विविध प्रकारचे अग्नि यांचे वाचक शब्दहि या वर्गांत समाविष्ट केले आहेत. कोशकार कर्नाटकांत राहणारा असल्यानें कांहीं देशी शब्दांना तो कर्नाटकी प्रतिशब्द देतो. उदा०,

'कर्नाटकीं कालवा तो पाट देशीय जाणिजे ।' ( २ )

कांहीं शब्दांच्या व्याख्या मात्र श्लेषात्मक व म्हणून काल्पनिक वाटतात. उदा०, 'नऊ वाद्यें जिच्या पुढें आहेत ती नौबत' ही व्याख्या पहावी ( ४२ ).

१४. **वनौषधीवर्ग** :—या वर्गांत प्रारंभीं वनस्पतींच्या विविध अवस्था ( उदा०, फांपावणें, पैसणें, सुरवाडणें, बाहाळणें, आहळणें, इत्यादि ) दर्शविणारे शब्द आहेत. त्यानंतर वनस्पतींचे समूह ( उदा०, जुंबाडी, झाडखंडें, बनें, कांटवण, दांग, इ० ) व वनस्पतींचीं पानेंफुलें यांचे वाचक शब्द असून शेवटीं वनस्पतींचे विविध प्रकार सांगितले आहेत. हीं नांवें सांगतांना कोशकार कित्येकदां त्याच शब्दांची पुनरुक्ति करतो व त्यामुळे अर्थ स्पष्ट होत नाहीं. उदा०, हिरडा म्हणजे हरडा ( ३८ ), कांगोणी म्हणजे कांगोणी ( ३९ ), सेंद्री म्हणजे सेंदणी ( ३९ ), किंवा गंगावती म्हणजे गंगवती ( ४१ ) असें म्हटल्यानें अर्थबोध होण्यास विशेष मदत होत नाहीं.

१५. **अन्नादि वर्ग** :—या वर्गांत प्रारंभीं खाद्य पदार्थांची यादी असून त्यांत 'बुत्ती' म्ह. 'रांधिला भात' ( ६ ), 'ठोबरा' म्ह. जोंधळ्याचा भात ( १० ), 'काला' म्ह. कालवलेलीं अन्नें ( ६ ), रोटी, भाकरी, दासटी, मोरोबा म्ह. दूधसाखर घेऊन रांधलेले आंवळे ( ८ ), मलिदा इत्यादि पदार्थांचा समावेश आहे. त्यानंतर कांहीं फळभाज्या व पालेभाज्या सांगून कवि अन्नाच्या खारट, तिखट, खमंग, सप्पक, मिळचट, चिंबट, पचपचीत इत्यादि विविध रुचिवाचक शब्दांकडे वळला आहे. भोजनोत्तर तांबूलांतर्गत पदार्थांत 'पोतास' म्ह. कापूर उल्लेखिलेला आहे ( २२ ).

१६. **व्यवहारवर्ग** :—या वर्गांत प्रारंभीं 'येसणें,' 'तेसणें' इ० सार्वनामिक विशेषणें, नंतर 'भाकणें', 'निगदणें', 'डौरणें', 'पंन्नासणें' इ० क्रियावाचक शब्द, त्यानंतर कांहीं मनोधर्मवाचक शब्द ( उदा०, 'येकवंकी', 'साजणें', 'झळंब', 'कणव', इ० ), व शेवटीं कांहीं समुदायवाचक ( उदा०, 'मेळा', 'घंटा', 'पाळा', 'गुंप', 'पोहा', 'मादियाळी', 'भीड', इ० ) व कांहीं भाववाचक ( उदा०, 'कांटाळा', 'चिळसी', 'अळंचु', 'बोरंग', 'गजदज', 'नाभिकारु', इ० ) शब्द आले आहेत. याचा अर्थ या वर्गाचें स्वरूप संकीर्ण आहे. या वर्गांत ज्ञानेश्वरींतील अनेक शब्द आढळून येतात.

**१७. वस्त्रवर्ग** :—या वर्गाचें नामकरण कोशकारानें केलेलें नाही. परंतु त्यांत मुख्यत: नाना प्रकारच्या वस्त्रांचीं नांवें असल्यानें त्याला 'वस्त्रवर्ग' असें म्हणतां येईल. या यादींत पाटोळा, चोळ, दुपटा, कांबोळी, अंगोळ, मुंडासें, पागोटें, पगडी, चिरडी, साउलें इत्यादि पुष्कळच तपशील भरलेला आहे.

**१८. जगतीवर्ग** :— हा वर्ग संकीर्ण स्वरूपाचा असून त्यांत पुढील विषय आले आहेत.

( १ ) घरांचे विविध प्रकार ( उदा०, त्रिसाळिकें घरें, धवळारें, तण्हारें, पाल्हेरें, इत्यादि ), व घराचे निरनिराळे भाग ( उदा., दारवंठा, वल्ली, सोपा, पडवी, भाणवसा, माडी, उपमाडी, वगैरे ).

( २ ) गृहोपयोगी वस्तु ( उदा०, बोघोणें, सुगडें, माट, मंडी वगैरे भांडीं; चोपाळा, वाज, खाट, पालख वगैरे साहित्य. )

( ३ ) विविध द्रव्यप्रकार ( उदा०, अपूट, ठेवणें, निक्षेप, केवा, केणें, मोदल, भांडवल, खजाना, भंडार, इ० ).

( ४ ) जमिनींचे प्रकार ( ऊखर, खड्ड, बींवड, खालपट, बदखल, इ० ).

( ५ ) रत्नांचे व मण्यांचे प्रकार ( उदा०, चिंतामणि, देवमणि, मोहरा, पाची, पवळें, नील, माणिक, इ० ).

वरील वर्गीकरणांत बसत नाहीत असेहि अनेक शब्द या वर्गात असून त्याचें 'जगतीवर्ग' हें नांव सार्थ झालें आहे !

**१९. सेनावर्ग** :— या वर्गात युद्ध, योद्धे, त्यांचीं हत्यारें व वाहनें यांचे द्योतक शब्द आहेत. साहजिकच त्यांत जंग, जंगी, खाना, लस्केरी, सिपाई, फौज इ० फारसी शब्द बरेच आढळतात.

**२०. बुद्धिवर्ग** :— मानवी बुद्धीचे विविध व्यापार हा प्रस्तुत वर्गाचा विषय आहे. त्यांत समजणें, उमजणें, आठवणें, इच्छिणें, अपेक्षिणें इ० क्रियांचे वाचक शब्द आले आहेत. कोशकाराचें पाहणें किती बारीक आहे तें त्याने 'उमज' व 'समज' या दोन साधारणपणें समानार्थी शब्दांच्या केलेल्या पुढील व्याख्यांवरून कळून येईल.

> " आठऊनी समजणें उमजू त्यासि बोलिजे ।
> समजू तो तेचि अखल ( अक्कल ) बूझ तो म्हणिजेतसे ॥ " ( १·२ )

तसेंच 'कौशल्य ते कुलकर्णी, तेंच चातुर्य बोलिजे' ( १६ ) ही त्याने दिलेली व्याख्याहि उद्बोधक आहे.

२१. **देवतादि वर्ग** :— या वर्गात प्रारंभीं निरनिराळ्या देव-देवतांचीं पर्यायनामें दिलीं आहेत. त्यांत कष्ट ( कृष्ण ), रमानाहो ( विष्णु ), हैवतो ( हयपति ), मल्लारी ( माळसापति ), हणगोबा ( मारुति ), रामवरदाइनी ( तुळजा ), विठोबा, रुखुमाई अशीं अनेक देवतें आहेत. लक्ष्मीच्या पाठोपाठ ' देवदासी ' चा उल्लेख, व तोहि ' सुळी ', ' कळावंतीण ' आणि ' नाचणी ' या पर्यायशब्दांनी युक्त, पाहून थोडें चमत्कारिक वाटतें. तीच गोष्ट ' हणगोबा ' या हनुमानवाचक पर्यायशब्दाचीहि आहे. तुकाईस किंवा तुळजादेवीस ' श्रीरामवरदाइनी ' म्हटलेलें पाहून रामदासांचें तें प्रसिद्ध स्तोत्र डोळ्यांपुढें येतें.

२२. **कारेगारवर्गः**— हा वर्ग अतिशय लहान, म्हणजे अवघ्या तीन श्लोकांचा आहे. बहुधा तो अपूर्ण असावा. त्यांत तराज, पालडी, तागडी, कांटाळें इत्यादि दहापांच मापनविषयक शब्द आले आहेत.

२३. **गोधनवर्गः**— या अखेरच्या वर्गांत गाई-म्हशी, त्यांचीं पाडसें व तीं बांधण्याचीं ठिकाणें यांचे वाचक शब्द आले आहेत. त्यांत ' गाईचें ठाण ' तो गोठा किंवा गोठाण, परंतु तोच ' राजगृहींचा गोठा ' असेल तर मात्र त्याचें नांव ' थट्टी ' अशी एक मनोरंजक नोंद आढळते ( ७ ).

याप्रमाणें कोशकारानें शब्दांचा संग्रह त्यांची वर्गवारी करून केला आहे. वरील वर्गीकरण उघडच सदोष आहे. त्यांत अव्याप्ति व अतिव्याप्ति हे दोन्ही दोष आहेत. तसेंच ' व्यवहार ' किंवा ' जगती ' यांसारख्या वर्गांचें स्वरूप फारच संकीर्ण वाटतें. प्रमाणबद्धताहि कमीच आहे. उदाहरणार्थ, ' नानार्थ ' वर्गांत ४४३ श्लोक आहेत, तर ' नरप्रकृति ' किंवा ' वस्त्र ' किंवा ' गोधन ' यांसारख्या वर्गांतील श्लोकसंख्या २० च्या आंत भरते. ' कारेगार ' वर्ग तर अवघ्या तीन श्लोकांचा आहे. कदाचित् तो अपूर्णहि राहिलेला असावा. एकंदरींतच या कोशांत अपूर्णता अनेक ठिकाणीं जाणवते. पुढील वर्गांतील अपूर्णता त्या त्या ठिकाणीं दर्शविली आहे :—

## अपूर्ण राहिलेले वर्ग

( १ ) ११·८. या श्लोकांतील प्रथम चरणाचा फक्त पूर्वार्ध मिळाला आहे. या चरणाचा उत्तरार्ध व संपूर्ण दुसरा चरण मिळालेले नाहीत.

( २ ) ११·९. दुसऱ्या चरणाच फक्त पूर्वार्ध आहे.

( ३ ) १८·१२३. फक्त पहिला चरण संपूर्ण आहे, दुसरा चरण नाहीं.

( ४ ) २१·३१. दुसऱ्या चरणाचा उत्तरार्ध नाहीं.

( ५ ) २२·३. या वर्गांत दोन श्लोक संपूर्ण असून तिसऱ्यांतील फक्त दीड चरण उपलब्ध आहे. यावरून या वर्गाचा बहुतेक भाग गहाळ झाला असावा असें वाटतें.

एकंदर कोशहि अपूर्ण राहिलेला असावा अशी शंका येते. त्यांत एकूण २३ वर्ग आहेत. तेविसाव्या वर्गाच्या अखेरीस इतर वर्गांप्रमाणेंच ' इति वर्ग २३' असा साधा निर्देश आहे. हाच वर्ग कोशाचा अंतिम वर्ग असता तर प्रास्ताविक भागाप्रमाणेंच कोशाच्या समाप्तीनंतरहि कांहीं मजकूर कोशकाराने लिहिणें अवश्य वाटतें. कोशकाराने तो लिहिलाहि असेल; परंतु आज तरी तो उपलब्ध झालेला नाही. कदाचित् तेविसावा वर्ग लिहून पूर्ण झाल्यानंतर कांहीं कारणामुळे कोशकाराच्या हातून कोशाचें लेखन पूर्ण झालें नसण्याचीहि शक्यता आहे. अखेरीस लेखक, लेखनकाल व लेखनस्थळ यांचा निर्देश नाही ही गोष्ट प्रस्तुत कोश अपूर्ण असावा या कल्पनेस बळकटी आणते.

## रचनापद्धति

या कोशामध्यें भिन्नभिन्न विषयांतील शब्दांचा संग्रह करतांना कोशकाराने सर्वत्र एकाच पद्धतीचा अवलंब केलेला नाही. या बाबतींत पुढील तीन प्रकारांनी रचना झालेली आढळते.

१. एकाच वस्तूचे वा क्रियेचे पर्यायशब्द एकापुढे एक नमूद करणें. उदा०,

( १ ) ' सिक सिक्षा सिकवणें शिक्षणें सिक लावणें । ' ( ५·१४ )
( २ ) ' गरीब दुबळा दीन तोच येळील बापुडा । ' ( ११·४ )

२. प्रथम शब्द देऊन नंतर त्याचा अर्थ सांगणें : उदा०,

( १ ) **नाभिकारू** अभयवाक् ( ५·१८ )
( २ ) **थांब** शब्दें राहवणें ( ५·२६ )
( ३ ) **धवला** तो वस्त्र मोटें ( १७·५ )

३. प्रथम अर्थ सांगून पुढे शब्द ठेवणें : उदा०,

( १ ) कंटाळवाणा जो शब्द म्हणीजे त्यासि **ठकठक** ॥ ( ५·७१ )
( २ ) नेत्राचें पातया पातें लागतांचि **निमिष्य** तें ॥ ( ८·३ )
( ३ ) नेदी रुची कोणतीहि पदार्थ तोचि **सप्पक** ॥ ( १५·३२ )

४, क्वचित् समानार्थक शब्दापुढेच कोशांतील शब्द ठेवणें. उदा०,

| | |
|---|---|
| ( १ ) अत्याशा तेच **लालूची** | ( २०·८ ) |
| ( २ ) उपाय तो **हुनर** | ( २०·१७ ) |
| ( ३ ) यात्रेकरू **कापडी** ते | ( ११.१४ ) |

## इतर कांहीं वैशिष्टयें

पहिल्या प्रार्थनावर्गांत कोशाचें स्वरूप वर्णितांना हा ' महाराष्ट्रभाषा कोश ' असल्याचें कोशकाराने लिहून ठेविलेलें असलें तरी हा केवळ मराठी भाषेचाच कोश नाही. कोशांतील कांहीं स्थळांवरून असें वाटतें, कीं देशी वा प्राकृत पर्याय-शब्दां-बरोबर संस्कृत पर्याय-शब्द देणें हाहि कोशकाराच्या मनांत एक उद्देश होता. उदा०, पुढील नोंदी पहा :—

| | |
|---|---|
| १. चाम तें चामडें **चर्म** कातडेंही नपुंसकीं ॥ | ( १२·१ ) |
| २. काउळा कावळा काग **काक** ही म्हणिजे तया ॥ | ( १२·१० ) |
| ३. मुगुट तें तेंच **मुंड** समसंस्कृत **मस्तक** ॥ | ( १०·३ ) |
| ४. कुरूप तेंच **विद्रूपें** कुबजें कुबडें कुन्हें | ( ७·१३ ) |

## ज्ञानेश्वरीते वाट पुसतु

रामकवीने आपला ' भाषाप्रकाश ' मुख्यत: ज्ञानेश्वरीच्या आधारें रचिलेला दिसतो. कोशारंभीं ' ज्ञानेश्वर्यादिकाधारें वदतों स्वल्पही बहु ' ( १·१२ ) असें त्याने म्हटलेंहि आहे. अन्यत्रहि एका ठिकाणीं तो ज्ञानेश्वरीचा उल्लेख करतो.

' पितामहाचिया नामीं अजा नाम नरासि ये ।

ब्रह्मा तोच अजा आणी धात्रा ज्ञानेश्वरीमधें ॥ ' ( २१·१९ )

साहजिकच अपेक्षा अशी, कीं प्रस्तुत कोशांत ज्ञानेश्वरींतील शब्द विपुल प्रमाणांत मिळावे. ही अपेक्षा सफलहि होते. कारण सुमारें ४५०० शब्दांच्या या कोशांत ज्ञानेश्वरींतील शब्द सुमारें ४५० सांपडतात. म्हणजे त्यांतील एकूण शब्द-संग्रहाचा दहावा भाग ज्ञानेश्वरींतून सिद्ध झालेला आहे. प्रस्तुत संपादनाच्या शेवटीं जोडलेली ' शब्दसूचि ' वरवर चाळली असतांहि ही गोष्ट स्पष्ट होईल. ज्ञानेश्वरींतून घेतलेल्या या सर्वच शब्दांची यादी येथे देण्याचें कारण नसलें तरी त्यांतील कांही निवडक शब्द येथे देणें उद्बोधक ठरेल. हे शब्द ते ज्या क्रमाने आले त्या क्रमाने व अध्यायवारीने पुढे दिले आहेत.

**अध्याय ३ रा** :— मातुके; भातें.

**अध्याय ४ था** :— तुर्गें; घुमारा; हळ्रु.

**अध्याय ५ वा** :— मात; माक; साचार; निरुतें; निकें; फुडें; साबाव; बोभाणें; अव्हासव्हा; होड; बुझावणी; रळी; वोसणणें; चाउटी; फांटा; गदारोळ.

**अध्याय ६ वा** :— जावळें; दुव्हें; बिजें; तिजें; आख; थेकुलें; मोटकें; अळुमाळ; मवणी.

**अध्याय ७ वा** :— चांग; बरवें; लेसें; कोडीसवाणें; ढिसाळ; सानें; थेकुटें; आशिकें.

**अध्याय ८ वा** : वाडवेळ; लवलाहें; अवसांत; अवचटें; नीचनवें, मोहरें; कीळ; ढाळ; वोप; दिवी; पोत; मसैरें; हवाव; भांभ; नव्हाळी; हिंवार; धांदा; लाणी; वेंच; अडसो; राणींव.

**अध्याय ९ वा** : अपाड; अहाच; अनारिसें; अरौता; अपैतें; अधाडा; आळुकी; बीदी; आटि; आथिला; आभारैला; आयणी; आगर; इसाळ; उपनला; उधवला; उवाइला; उजरी; उभड; उवावो; उगाणा; उंडी; ओथंबा; कुरुठा; कांटाळा; कुडें; कुवांसा; कामठा; कांतले; खेव; खळाळ; गव्हार; गहींस; गाडोरा; चोहट; ठी; तागा; थांव; थोक; दिठी; दुवाडपण; दादर; दुस; दळवाडें, वोहर; धसाळ; निडार; नइ; पवाड, पावळें; पाहुणेर; पुंस; फाडोवाडें; फोंडी; बिक; वीजें ( =येणें ); वोहरी; विसाट; तुंथी; भडसा; अंकणा; मा; लाणी; कडियाळी; वानिवसें; पातेजणें; वोळगणें; विवळ; विंचंबु; विंदाणें; वोजा; वोभाणें; वोरस; वेलाउळ; वालीप; विरजा; वास ( पाहणें ); वोल-ली; विपाइलें; साउसा; सैंघ; सोय; सळ; सांसिनला; हियें; हिव्रसें.

**अध्याय १० वा** : निमथा; चवरें; पलक; अगरडा; वोडी; माज; दरा ( = पोट ).

**अध्याय ११ वा** : वेथ; सदट; गव्हार; गहिंस; उळिगा; निसुगें; कापडी.

**अध्याय १२ वा** : भोसकें; शेवडी; तळगें; रावा.

**अध्याय १३ वा** : अबुखें; उभडा; पाणियाडें; कुहा; मेर; डोणी; अबुटें; मेहुडें; बावनु; फुणगी; अगिटी.

**अध्याय १४ वा** : पैसगें; सुरवाडणें; पणपणें; मगमगी; दांग; साईं; अणियाळें; रुंख; डीरीं; गंगवती.

**अध्याय १५ वा** : रससोय; वोनें; वोगर; खिचु; आरोगणें; पोतास. सियाळें; कुहिजलें.

**अध्याय १६ वा :** विपाइलें; आगळें; समतुकें; साटी; पल्लासिलें; येकवंकें; कुवासें; अनारिसें; सळेंव; नाथिलें; खेंव; अंतौरी; अउदन; त्रिह; मे; पासरु; दादुला; निघोंट; पाळा; पोहा; मादियाळी; भीड; आन; भुररें; पातेरा; उबारा; चिळसी; उपंढर; रिगी-निगी; अतिसो; नाभिकारु; पसाव; सुरवाडी; अमाळसें; आतौटां; भीतरीं; माजिवटां; वोळणें; उजु; कैपक्षी; पतिकरु; गोवा; गुंथाडें.

**अध्यया १७ वा :**— दिंड; पाटोळा; पालव; साउलें.

**अध्याय १८ वा :** पिडें; दारवंठा; भाणें; धवळारें; बिढार; राऊळ; तण्हारें; चोहटा; केणें; खेवणें; ऊखर; बींवड; गारी गडदर; हरळ; मांदूस; वोथिंवा; वळघणें; वेधणें; तुरंबिणें.

**अध्याय १९ वा :**— धुरा; ठाणोरा; अशिवार; चडखर्णा; वायकांड.
**अध्याय २० वा :**— बूझ; उखीविखी; आरतें; भडस; शिराणी; सहाडू.
**अध्याय २१ वा :**— नाहो; दळवै; जगजेठी; अव्हा.
**अध्याय २२ वा :**— मूस; कांटाळें.
**अध्याय २३ वा :**— वांठी; अखूर.

## थोडी तौलनिक पाहणी

ज्ञानेश्वरींतील कांही शब्दांच्या अर्थाविषयीं विद्वानांत अजूनहि मतभेद आहेत. तसेंच, कांही शब्दांचे निश्चित अर्थ आपणांस ठाऊक नसून अशा शब्दांचें निर्वचन आधुनिक टीकाकार कित्येकदां स्थूलमानानेंच करीत असतात. उदा०, ज्ञानेश्वरींतील ' भातुकें ' ( ज्ञा. १०.१८; ३.२४३ ) हा शब्द पहा. त्याचा अर्थ ' सरकारी ' ज्ञानेश्वरीचे संपादक, प्रा. दांडेकर व प्रा. वेलिंगकर असे सर्वजण ' खाऊ ' किंवा ' खाण्याचा पदार्थ ' असा देतात. उलट, रामकवीच्या प्रस्तुत कोशांत त्याची व्याख्या पुढीलप्रमाणें आढळते :—

' इच्छापूर्तीस जें देणें म्हणिजे तेंच भातुकें । ' ( ३.४ )

' अव्हासव्हा ' या ज्ञानेश्वरींतील शब्दाची ( ज्ञा. १३. ७६९; १८. ७१६ ) गोष्ट अशीच आहे. या शब्दाचे अर्थ प्रा. वेलिंगकर ' उगाच, भलतेंच, भलतीकडे ' व प्रा. दांडेकर ' भलतें, हवें तसें, बरेंवाईट न पाहतां ' असे करतात. प्रस्तुत कोशांत या शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणें केलेली आढळतेः—

' अव्हासव्हा अडावेडा बोली तोचि असंगत । ' ( ५.१३ )

सारांश, रामकवीचा हा ' भाषाप्रकाश ' ज्ञानेश्वरींतील अनेक शब्दांवर प्रकाश पाडूं शकेल असें वाटतें. त्यांत आलेल्या ज्ञानेश्वरींतील कांही निवडक शब्दांच्या

व्याख्या पुढे नमुन्यादाखल दिल्या आहेत. शब्द अकारविल्ह्याने दिले असून प्रथम त्यांचा ' भाषाप्रकाशां ' तील व नंतर ज्ञानेश्वरींतील वापर पुढे दर्शविला आहे.

**अहाच** ( = वरवर )

वरचेवर सामान्य अहाच ह्मणिजे तथा ।

( भाषा० १८·१२१ )

आतां जाइयांचें जैसें लेणें । आंगावरि आहाचवाणें ।

( ज्ञा० ९·४०८ )

**इसाळ** ( = लोभी )

इसाळ ह्मणिजे ईर्षा कामुक ब्रह्मराक्षस ।

( भाषा० ९·४३ )

आणि इसाळु जैसा घरा । कां दंदिया हातियरा ।
न विसंबे भांडारा । श्रद्धकु गा ॥

( ज्ञा० १३.५०० )

**उखर** ( = माळरान; नरड जमीन )

लोणारी मीठमातीची तेचि ऊखर ऊषर ।

( भाषा० १८·७४ )

कां तेजा आणि उखरा । भेटी जालेयां वीरा ।
मृगाजळाचिया पूरा । रूप होये ॥

( ज्ञा० १३·१०४७ )

**उखीविखी** ( = तर्कवितर्क; शंकाकुशंका )

होय नोव्हे तर्क ऐसा करणें ते उखीविखी ।

( भाषा० २०·२ )

ऐसी हान उखीविखी । करितु आहासि मानसिकी ।

( ज्ञा० १५·३८२ )

**उवाव** ( = आनंद; सुख )

उवावो सुखआधिक्य... ।

( भाषा० ९·५० )

तेथ साउमा घेआवा उवावो । तवं मांडला आनु प्रस्ताओ ।

( ज्ञा० १६·६१ )

**उळिगा** ( = सेवक )

...उळिगा परिचारक ।

( भाषा० ११-६ )

उळिग मी करीन । आंधोळींचें ॥

( ज्ञा० १३-४१८ )

**ओथंबा** ( = आधाराचा खांब )

ओथंबा पाठिराखाही साक्षिही ह्मणवोनि घे ।

( भाषा० ९-६३ )

हा प्रकृतीमाझि उभा । परि जुइं जैसा वोथंबा ।

( ज्ञा० १३-१०१६ )

**कांटाळा** (= १. रोमांच; शहारा. २. तागडी )

( १ ) कांटाळा बद्ध रोमांच, ( २ ) कांटाळाहि तराजही ।

( भाषा० ९-६७ )

( १ ) सर्वांगा कांटाळा आला ।

( ज्ञा० १-१९७ )

( २ ) ना तरि पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरि जोडे ।

( ज्ञा० ४-१७९ )

**कामठा** ( = १. टांकसाळ; २. कार्यस्थान )

( १ ) कामठा ते टांकसाळ, आणि ( २ ) कामाट कामही ।

( भाषा० ९-७४ )

( १ ) जेतुलें पांचभौतिक घडतें । जें जें नांवरूपा सांपडतें ।
गुणत्रयाचां पडतें । कामठां जें ॥

( ज्ञा० १५-४४७ )

( २ ) तेव्हां कर्त्ता रिगे कामठां । कर्तृत्त्वाचां ॥

( ज्ञा० १८-३५६ )

**केणें** ( = द्रव्य ? )

केवा तो आणि केणें तें अपार धन बोलिजे ।

( भाषा० १८-६० )

तेया ध्वनिताचें केणें सोडुनि ।

( ज्ञा० ६-२९२ )

**कोडीसवाणें** ( = चांगलें; कौतुकाई )

कोर्डीसवाणें तें ऐसें चांगलें कौतुकाई जें ।

( भाषा० ७·६ )

ऐसा कोडिसवाणा तूं बापा । होंसि पैं विश्वरूपा ।

( ज्ञा० ११·१८६ )

**गाडोरा** ( = खळगा; पाया )

गाडोरा खळगा पाया... ।

( भाषा० ९·१०५ )

म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटौनि गाडौरा ।

( ज्ञा० १८·१४९७ )

**गहींस** ( = १. अज्ञानी; २. निवांत )

गहींस म्हणतां येथें नेणताही निवांतही ।

( भाषा० ९·१०५ )

परि असतें जींत न गणिति । गैसासै पै ॥

( ज्ञा० ९·५०८ )

**चाउटी** ( = बडबड )

चाउटी चौंपरी चर्चा......... ।

( भाषा० ५·३५ )

तैसा मी जन्हीं तुह्मांप्रति । चावटै करितसें बाळमती ।

( ज्ञा० ९·१६ )

**चेव** ( = जागृति, जाग )

सुत्धीचा उपजू चेवो ह्मणिजे सुद्धि जागृती ।

( भाषा० २०·४ )

पाठीं अवसांत ये चेओ । तैं तैं आधवेंचि होये वावो ।

( ज्ञा० ६·६९ )

**ठाणोरा** ( =योद्धा; लढवय्या )

रणीं झुंझोनि जाला तो ठाणोरा ह्मणिजेतसे ।

( भाषा० १९·४ )

ठाणौरियाचे मवावे । आणिकीं घाये ॥

( ज्ञा० १८·४३६ )

**ठी** ( =स्थान; स्थिति )

ठाके स्थिरे कुंठितही ठी संख्या स्थितिही कळो ।

( भाषा० ९·१५७ )

जैसा पूर्वापरां नदी । समुद्रुचि ठी ॥

( ज्ञा० १५·४०० )

**तागा** ( =नाव ढकलण्याचा वेळू )

नावेसी चालवायाचा वेळु तागा अथारहि ।

( भाषा० ९·१६५ )

जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे ।

( ज्ञा० ७·८८ )

**दादर** ( =विवर; मार्ग )

सुरंगा आणि विवरा दोंते दादर बोलिजे ।

( भाषा० ९·१८६ )

मग मध्यमा मध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें ।
टाकिलें चवरें । ब्रह्मरंध्रिचें ॥

( ज्ञा० १२·५५ )

**दांग** ( = अरण्य; झाडी )

झाडांची दाटणी जेथें झाडी ते दांग तें तथा ।

( भाषा० १४·१३ )

काळकूटकल्लोळीं कवळिलें । नाना महाअविद्यांचें दांग उमटलें ।

( ज्ञा० ११·२१३ )

**दादला** ( = नवरा; वीरपुरुष—ज्ञा० )

दादूल दादला दाह्ला पंति नाह्ो प्रियू तथा ।

( भाषा० १६·५२ )

बिरिदांचे दादुले जाले । हींवा ऐसे ॥

( ज्ञा० १·१३५ )

**धवळार** ( = चुनेगच्ची बांधणीचें घर )

धवळारें गच्चगीरी चुना आलेपिलीं घरें ।

( भाषा० १८·१२ )

देखा धवळारीं चिंतामणिन्चां )

( ज्ञा० ८·६ )

**परगुणें** ( = पाहुणचार; मेजवानी-ज्ञा.• )

......परगुणे ह्मणेजे पाहुणेरु तो ।

( भाषा० ९·२३२ )

साहाजें ब्रह्मरसाचें परगुणें । केलें अर्जुनालागि नारायणें ।

( ज्ञा० ६·२ )

**पावळ** ( = हीन; कमी प्रतीचें )

पावळें ( १ ) पर्णकुटिका, ( २ ) तुछ, ( ३ ) नश्वरही तथा ।

( भाषा० ९·२२२ )

जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभवना पावळें ह्मणे ।

( ज्ञा० ६·३६२ )

**पोतास** ( = कापूर )

...पोतासू तोच कापुर ।

( भाषा० १५·२२ )

तेया तत्त्वज्ञाना चोखटा । दिवी पोतासाची सुभटा ।

( ज्ञा० १०·१२६ )

**फाडोवाडें** ( = वेगळें; निराळें )

फाडोवाडें वेगळें तें ... ।

( भाषा० ९·२५३ )

एवं तुजपुढां । आदिक्षेत्र गुह्याडा ।
दाविलें फाडोवाडां । विवंचूनि ॥

( ज्ञा० १३·९३४ )

**बाबुळी** ( = शेवाळें )

बाबुळी आणि गोंडाळें तेंच शेवाळ जाणिजे ।

( भाषा० १३·१२ )

परि उदकीं जाली बाबुळी । उदकातेंचि जैसी झांकोळी ।

( ज्ञा० ७.५९ )

**विक** ( = आधिक्य; सामर्थ्य )

अदीक तें अधिक तें विक तें आणि आगळें ।

( भाषा० १६.२ )

वेधें परिमळाचें वीक मोडे । जेयाचेनि ॥

( ज्ञा० ६.१५ )

**बींवड** ( = सुपीक जमीन )

...पिकाची भूमि बींवड ।

( भाषा० १८.७६ )

आतां कृष्णवाक्यबीजा निवाड । आणि संजयो सात्त्विकाचा बिंवड ।

( ज्ञा० ९.५२८ )

**बुंथी** ( = गवसणी; खोळ )

पेहणीं वोडणी बुंथी ... ।

( भाषा० १७.७ )

ना तरि कदळीचा गाभा । बुंथी सांडून उभा ।

( ज्ञा० ६.२९५ )

**वेथ** ( = दांडगा; सबळ )

दांडगा वेथ सदट धो आणिक धटिंगण ।

( भाषा० ११.२ )

वरि भीमसेनु वेंथु । तो जालासे सेनानाथु ।

( ज्ञा० १.१२० )

**मसैरें** ( = अंधार )

मसैरें तेंच अंधारें... ।

( भाषा० ८.८५ )

तेंचि अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मसैरें फिटे ।

( ज्ञा० ५.८३ )

**येकवंकी** ( = एकरूपता; मैत्री )

मैत्री ते येकवंकी ... ।

( भाषा० १६·२९ )

मज येकवंकीचिया स्थिति । आवडतसे ॥

( ज्ञा० ४·११ )

**रससोय** ( = अन्न; स्वयंपाक )

रससोय असें स्त्रीत्वीं बोनें वोगर वोदन ।

( भाषा० १५·२ )

आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये ।
तरी सरों नये रससोए । ऐसें आथि ॥

( ज्ञा० १३·६४२ )

**राऊळ** ( = राजवाडा; देऊळ–ज्ञा० ) :

दिवाणवाडा राउळ दरबारहि बोलिजे ।

( भाषा० १८·१६ )

......। मग सामरस्याचां राउळीं ।
महासुखाची दिवाळी । जगासि दिसे ॥

( ज्ञा० ६·३८८ )

**राणीव** ( = राज्यपद )

राजत्व तेंच राणीव ... ।

( भाषा० ८·१२२ )

जे योगाची वरव । संतोषाची राणीव ।

( ज्ञा० ६·३७२ )

**लेसें** ( = चांगलें; नीटपणें )

नेटकें बरवें लेसें बरेंही नीट ठीक तें ।

( भाषा० ७·३ )

मग प्रमेयांचिया गांवा । लेसां जाइजो ॥

( ज्ञा० ७·२०४ )

**विळें**[1] ( = नित्य; निरंतर )

अखंड सर्वदा नित्य निरंतर विळें सदा ।

( भाषा० ८·५७ )

जैं चौकडिया सहस्रु जाये । तैं ठाये ठाओ वीळु होये ।

( ज्ञा० ८·५४ )

**वोरस** ( = वात्सल्य )

माउलीची दया तोकीं तोचि वोरस बोलिजे ।

( भाषा० १६·३७ )

मग आर्त्तीचेन ओरसें । गीतार्थग्रथनमिसें ।
वरिखला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥

( ज्ञा० १८·१७४० )

**साटी** ( = जोड; योग्यता )

समान जोड जोगेंही सखें साटीहि बोलिजे ।

( भाषा० १६·१४ )

मरणेंसिं साटी । नमस्कारितां ॥

( ज्ञा० १३·१८९ )

**हल्लरु** ( = अंगाईगीत )

बालार्थं गातां योषेचा गीत पल्लव हल्लरु ।

( भाषा० ४·२१ )

सतरावियेचें स्तन्य देसी । अनाहताचा हल्लरु गासी ।

( ज्ञा० १२·७ )

**हवाव** ( = शोभा )

हवाव भांभ शोभाही नव्हाळी आणिखी कळा ।

( भाषा० ८·९४ )

तंव श्रोते ह्मणती दैव । कैसी बोलाची हवाव ।

( ज्ञा० १·१३२ )

---

१. या शब्दाचा अर्थ ज्ञानेश्वरीच्या सरकारी प्रतींत 'ब्रह्मदेवाचा एक दिवस' असा दिलेला आहे तो वरील अर्थाशीं संबद्ध दिसतो.

## रामदास-तुकारामांतील काहीं शब्द

याशिवाय रामदास-तुकारामांच्या काव्यांतील काहीं शब्दांच्या अर्थाचा उलगडा प्रस्तुत कोशाच्या आधारें होऊं शकतो. उदा०, 'कानडें,', 'ठकठक' व 'येळील' हे तीन शब्द रामदासांच्या लिहिण्यांत अनेकदां येतात. पुढे त्यांच्या 'दासबोधां' तून प्रत्येकीं एक उदाहरण देतों :—

'जें वेदांसि सांकडें । जें शब्दांसि **कानडें**'

—(दा. ५·१·२)

'टस ठोंबस टाकावेना । **ठक ठक ठक** करावेना'

—(दा. १४·४·१२)

'म्हणोनि **येळील** न करावें । पाहाणें तें येथेंचि पाहावें'

(दा. १९·५·१६)

वरील तीन शब्दांचे अर्थ प्रस्तुत कोश पुढीलप्रमाणें देतो :—

'अतर्क्यही **कानडें** तें..........'

(भाषा० ९·८१)

'कांटाळवाणा जो शब्द ह्मणिजे त्यासि **ठकठक**'

(भाषा० ५·७१)

'गरीब दुबळा दीन तोच **येळील** बापुडा ।'

(भाषा० ११·४)

वरील व्याख्या त्या त्या रामदासी शब्दांवर चांगला प्रकाश पाडतात. क्वचित् स्थळीं मात्र रामकवीचा हा शब्दकोश वाचकास घोटाळ्यांत टाकतो. उदा., 'भिंगुळ' हा शब्द पहावा. रामकवि त्याचा समावेश 'नानार्थवर्गा' त करून त्याचे दोन अर्थ पुढीलप्रमाणें देतो :—

'भिंगूळसें पिंगट तें अनोळखहि भिंगुळ' ।

(भाषा० ९·२८७)

अर्थात् 'भिंगुळ' म्हणजे अनोळखी हा एक अर्थ त्याला अभिप्रेत दिसतो. तुकारामाच्या गाथेंत हा शब्द वरील अर्थानें आढळतो हें खरें. उदा.,

‘ ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें ।
जीवलग नेणे मज कोणी ॥

( तुकाराम–गाथा, सरकारी प्रत, क्र. ३३६१ )

ज्ञानेश्वरींत मात्र हा शब्द भयंकर, भीतिदायक किंवा विपरीत या अर्थानें येतो. उदा.,

‘ हें असो काळें आवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण ।
तैसें अति भिंगुळवाणेंपण । वदनाचें तुझें ॥ ’

( ज्ञा. ११·३४१ )

‘ जो जेथिचें गौरव नेणे । तेयातें भिंगुळवाणें ’

( ज्ञा. १८·१६०७ )

याप्रमाणें ज्ञानेश्वर, तुकाराम व ‘ भाषाप्रकाश ’ कार रामकवि ‘ भिंगुळ ’ किंवा ‘ भिंगुळवाणें ’ हा एकच शब्द तीन निरनिराळ्या अर्थांनी वापरतात. अर्थात् तिघांच्या वापरांतील अर्थभेद सूक्ष्म आहे, मूलभूत स्वरूपाचा नाही. तात्पर्य, प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासास प्रस्तुत शब्दकोशाचें महत्त्व विशेष आहे.

## कानडी शब्दांचा भरणा

प्रस्तुत कोशांतील कानडी किंवा द्राविडी शब्दांचा भरणाहि लक्षणीय आहे. कोशकार स्वतः आपण ‘ कर्नाटकनिवासी ’ असल्याचें प्रारंभीं सांगतो हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. साहजिकच त्यानें रचिलेल्या कोशांत अडकित्ता, खोपटें, गडे, बुगडी, बोगराळें, हंडा यांसारखे मराठी माणसाच्या नित्याच्या व्यवहारांत वापरले जाणारे शब्द तर येतातच; पण त्याबरोबरच महाराष्ट्रीयांना विशेष परिचित नसलेले असेहि कांही कानडी शब्द त्याने कोशांत संग्रहित केले आहेत. उदा०, कांणोवांणो, आळुकी, हल्लरु, मोटकें, ढाळ, सुळी, बिक, बोडी, बेथ, हिंगो, उळिग, बोनें, हरळ, चडखणी, इ० यांपैकीं कांहीं शब्द ज्ञानेश्वरींत आढळतात व त्यांचा विचार मागे केलाच आहे. द्राविडी भाषेशीं कोशकाराचा परिचय इतका आहे, कीं क्वचित् मराठी शब्दाचा अर्थ सांगतांना तो कानडी शब्दपर्याय देतो. उदा०,

‘ नाचणी म्हणिजे राग्री, सुळीचें नांव नाचणी । ’

—( नानार्थ वर्ग, २०७ )

‘ देवदासी सुळी तेच कळवांतीण नाचणी । ’

—( देवतादि वर्ग, २

वरील चरणांतील ‘ सुळी ’ ( =वेश्या ) हा शब्द शुद्ध कन्नड आहे. तसेंच पुढील चरणांतील ‘ बुत्ती ’ हा शब्द असाच कानडी भाषेंतील आहे.

“ स्रीत्वीं सिदोरी बुत्तीही बांधिला भात बोलिजे । ”

—( अन्नादिवर्ग, ६ )

क्वचित् शब्दार्थ कन्नडभाषापद्धतीने सांगितला आहे. उदा०, किल्लीची पुढील व्याख्या पहावीः—

‘ किल्पाचा हात किली...... ’

—( नानार्थवर्ग, ७९ )

## फारसी-शब्दप्राचुर्य

कोशाचा रचनाकाल कोशाकाराने नमूद केलेला नाही याचा उल्लेख पूर्वी केलाच आहे. तथापि कोशांतील शब्दसंग्रहांत आढळणारें फारसी शब्दांचें वैपुल्य पाहिलें म्हणजे कोशरचनेच्या लेखनकालासंबंधीं ढोबळ अनुमान करणें शक्य होतें. मराठी भाषेंत फारसी शब्दांचा प्रवेश यादवकालापासून, म्हणजे बाराव्या-तेराव्या शतकापासून सुरू झाला. शिवकालीन मराठी भाषेंत आणि त्याहिपेक्षां पेशवे-कालीन मराठी भाषेंत फारसी शब्दांचें प्रमाण पदोपदीं जाणवेल इतक्या थरापर्यंत गेलें. सर्वसामान्य मराठी माणसाच्या व्यवहारांतहि यावनी शब्द घुसले. प्रस्तुत कोशाची रचनाहि त्याच सुमारास, मागेंपुढे केव्हांतरी झाली असावी. कोशाच्या शब्द-सूचीकडे वरवर नजर टाकली तरी त्यांत फारसी शब्द जागोजाग विखुरलेले आढळून येतात. उदा०,

अब्दागिरी, अश्रफ, इनाम, किता, कीमती, गफ, खुषामती, गरीबी, जाब, जिंदगाणी, तश्रीफ, फसकी, फौज, मजूरी, माहे, सोईन, मोम, रुक्का, सल्ला, सामान, सौक, हिशेब, हुकुम्दाज इ०इ०

याशिवाय कांही फारसी शब्दांचे अर्थ कोशांत स्पष्ट करून सांगितले आहेत. उदा०, पुढील नोंदी पहाव्या :—

‘ विद्यावंतासि उचित मोइना दरबारिच्या ।

( ३·६ )

‘ हिशेबासी न ये तैसें फसकी म्हणिजेतसे ।

( ३·११ )

‘ बहुमानीं वस्त्र देतां तश्रीफ म्हणिजेतसे ।

( ३·१७ )

'...... अश्रफे नाम मोहरा ।'

(९·३०४)

' मेण शब्दें हत्याराचें भरई। मड ओमही ।

(९·३०८)

ज्या अर्थी 'महाराष्ट्र-भाषे' च्या कोश रचणाराहि इतक्या फारसी शब्दांचा समावेश आपल्या कोशांत करतो, त्या अर्थी या शब्दांचा वापर तेव्हांहि समाजाच्या सर्व थरांमध्यें होत असला पाहिजे हें उघड आहे. तसेंच, कोशकार कर्नाटकांत म्हणजे तंजावर प्रांतांत राहणारा असूनहि त्यानें वरील व इतर अनेक फारसी शब्द आपल्या कोशांत नोंदावे या गोष्टीस विशेष महत्त्व आहे. कारण फारसीचा परिणाम मराठीसारख्या आर्यभाषेवर जितक्या प्रमाणांत झाला तितक्या प्रमाणांत तो कन्नड किंवा तामिळ यांसारख्या द्राविडी भाषांवर झाला नाही. असें असूनहि सुमारें साडेचार हजार शब्दांच्या या कोशांत अंदाजें शंभर शब्द फारसी आहेत ही वस्तुस्थिति भाषिक संपर्काच्या दृष्टीनें विचार करतां महत्त्वाची वाटते. फारसी शब्दांचें भारताच्या दक्षिणेकडील भाषांतून वाढतें प्रमाण १७-१८ व्या शतकांत दिसून येतें व त्यामुळे प्रस्तुत कोशांतील फारसी शब्दांचें अस्तित्व व प्रमाण पाहतां त्याची रचना वरील काळानंतर केव्हातरी झाली असावी असें वाटूं लागतें.

## समारोप

याप्रमाणें रामकवीच्या 'भाषाप्रकाश' चें स्वरूप आहे. मराठी भाषेचा एक जुना शब्दकोश म्हणून त्याचें महत्त्व आहेच. याशिवाय ज्ञानेश्वरीसारख्या सर्वमान्य ग्रंथाची अर्थलापनिका या दृष्टीनेहि तो वैशिष्ट्यपूर्ण आहे. ज्ञानेश्वरींतील कांहीं निवडक शब्दांचे अर्थ दोनशें वर्षांपूर्वी कसे होते तें रामकवीनें रचिलेल्या प्रस्तुत कोशावरून कळून येतें. तसेंच, तामिळनाडांतील तंजावरप्रांतीं स्थायिक झालेले मराठी भाषिक दोनशें वर्षांपूर्वी आपल्या मूळ, म्हणजे महाराष्ट्रीय संस्कृतीची जाणीवपूर्वक आठवण ठेवण्याचा प्रयत्न कसा करीत होते तेंहि रामकवीच्या या कोशरूप उद्योगावरून कळून येतें. त्या प्रांतांत मराठीवर घडलेले द्राविडी भाषेचे परिणामहि प्रस्तुत कोशावरून दिसून येतात. सारांश, मराठी भाषा, तिच्यांतील जुना शब्दसंग्रह व द्राविडीसारख्या एका निराळ्या संस्कृतीशीं संबंध आल्यामुळे तिचें कांहीं प्रमाणांत बदललेलें स्वरूप यांसारख्या अनेक प्रश्नांवर प्रकाश पाडण्यास तंजावरकर रामकवीचा हा 'भाषाप्रकाश' समर्थ आहे, असें त्याच्या अभ्यासान्तीं वाटतें.

---

# विषयानुक्रम



| वर्ग क्र. | वर्गनाम | श्लोकसंख्या | पृष्ठ |
|---|---|---|---|
| १. | प्रार्थना–वर्ग | १२ | १ |
| २. | संकेत–वर्ग | ३५ | २ |
| ३. | दान–वर्ग | २० | ५ |
| ४. | शब्दादि–वर्ग | ३३ | ७ |
| ५. | वाग्वर्ग ( 'पुर्वणी ' सहित ) | ७८ | १० |
| ६. | संख्या–वर्ग | ५१ | १६ |
| ७. | रूपादि–वर्ग | २३ | २० |
| ८. | काल–वर्ग | १२२ | २२ |
| ९. | नानार्थ–वर्ग | ४४३ | ३१ |
| १०. | अंग–वर्ग | ७९ | ६३ |
| ११. | नरप्रकृति–वर्ग | १९ | ६९ |
| १२. | पक्षी-खगमृगादि–वर्ग | १५ | ७१ |
| १३. | जलादि–वर्ग | ४६ | ७३ |
| १४. | वनौषधी–वर्ग | ५० | ७७ |
| १५. | अन्नादि–वर्ग | ४९ | ८१ |
| १६. | व्यवहार–वर्ग | १२२ | ८५ |
| १७. | वस्त्र–वर्ग | १८ | ९४ |
| १८. | जगती–वर्ग | १२६ | ९६ |
| १९. | सेना–वर्ग | २१ | १०६ |
| २०. | बुद्धी–वर्ग | २९ | १०८ |
| २१. | देवतादि–वर्ग | ३१ | ११० |
| २२. | कारेगार–वर्ग | ३ | ११३ |
| २३. | गोधन–वर्ग | ११ | ११४ |



* * *

रामकविकृत

# भाषाप्रकाश

## वर्ग पहिला

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीलक्ष्मीनृसिंव्हाय नमः
भाषाप्रकाशनामें महाराष्ट्रभाषाकोश आरंभ ॥
गणाधिपति वाग्देवी सद्गुरु श्रीनृसिंव्हजी ।
कवींद्र विद्वज्जनहो साधुहो प्रणमीं तुम्हां ॥ १ ॥
नेणत्या बाळभाषेतें वडीलीं गोड कीजते ।
माझी विनवणी प्राज्ञीं कौतुकें तेवि ऐकिजे ॥ २ ॥
महाराष्ट्रक भाषाब्धि पार खोलीहि नेणता ।
बिंदु दे सिंधुची गोडी संग्रहें तेवि बोलतों ॥ ३ ॥
भाषाप्रकाश म्हणुनी या ग्रंथा नांव ठेविलें ।
श्रीशासि वाणि नसतां तुळसीदळ आवडे ॥ ४ ॥
तुह्मांस तेवि मानोत माझे हे बोल सावडे ।
बाळका पढऊं येत प्राज्ञांनीं करुनी क्षमा ॥ ५ ॥
देशांतरींच्या देशस्थां स्मरणार्थ उपेगही ।
ह्मणोनी विरचीं ग्रंथ हा अहंभावही असो ॥ ६ ॥
कोश काव्य व्याकरण टीकाही बहुतीं बहु ।
केल्या पूर्वीं मतिपरी अर्थ येकीं न खंडला ॥ ७ ॥
ह्मणोनी आणिखी ग्रंथ करितील यथामती ।
सर्वकर्त्ता ईश येथें मजही तोचि बोलवी ॥ ८ ॥
त्या रूपेंचि तुह्मी श्रोते अर्पितों तुमचें तुह्मां ।
बीजीं वटाचा विस्तार स्वल्प शब्दांत त्यापरी ॥ ९ ॥
स्वप्रसादें अर्थजात सहजीं सज्ज होतसे ।
आपुलीयावरी तुह्मां अभिमान असेच कीं ॥ १० ॥
ह्मणोनी ग्रंथ हा ऐका विलासें कणवे करीं ।
कर्नाटकीं निवसलों नेणताही असो परी ॥ ११ ॥
ज्ञानेश्वर्यादिकाधारें वदतों स्वल्पही बहु ।
कोळे नृसिंव्ह देवाचा दास राम कवी ह्मणे ॥ १२ ॥

॥ इति श्रीभाषाप्रकाशीं प्रार्थनावर्ग पहिला संपूर्ण ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीरस्तु ॥

* * *

## वर्ग दुसरा

आतां कोशप्रस्तिागीं त्रिलिंगेंही कळावया ।
बोलीयेल्या खुणा काहीं सुचित्तीं ऐकिजेति त्या ॥ १ ॥

छंद वंद अटापेसी हे येकपरि बोलिली ।
तो ते तें ह्मणतां संज्ञा क्रमें पुं-स्त्री-नपुंसकीं ॥ २ ॥

बहुकाव्य खुणा ते त्या तियें पुंस्त्रीनपुंसकीं ।
पुल्लिंग आणि स्त्रीलिंग नपुंसक ह्मणोनिही ॥ ३ ॥

कितेक ठाईं कथिलीं शब्दलिंगें अशा परीं ।
साहचर्यें कितीयेक मानिजेत तसींच तें ॥ ४ ॥

सम शब्दें जाणिजे तो शब्द तो सम संस्कृत ।
वचनीं बहुतीं येकीं शब्द येती यथाक्रमें ॥ ५ ॥

भागादि येकीं बहुतीं वचनीं असती तरी ।
लिंगें वाक्यें सहपदीं बोलिल्यावीण तेंच तें ॥ ६ ॥

पुंल्लिंगीं नरु हे संज्ञा स्त्रीत्वीं स्त्री न नपुंसकीं ।
ऐसीयेही पद्धतीनें जाणिजे लिंगनिश्चयो ॥ ७ ॥

शब्दीं नकारासरिसें बोलिलें लिंग तें नव्हे ।
उरलीं दोनि लिंगेंही तेथें असति निश्चयें ॥ ८ ॥

अक्षि वाक् शंढ पुल्लिंगीं दों शब्दीं निर्नपुंसक ।
नादि शब्दीं अपुंल्लिंग निषेधीं उरलें खरें ॥ ९ ॥

त्रीलिंग ह्मणते ठाईं त्रिक ऐसें प्रयोजिलें ।
आणीक येक पर्यायें स्वरातें लिंगनिश्चय ॥ १० ॥

निवडोनी बोलियेले आणीजेत मनाप्रती ।
अस्वरीं तीन लिंगेंही दोर थार घरादिकें ॥ ११ ॥

लिंगांचा निर्णयो येथें पष्ट बोलेंचि जाणिजे ।
अस्वरीं शब्द भाषेंत स्त्रीलिंगीं अपरूपसे ॥ १२ ॥

काया माया आणि बला ह्मणोनी तीनि च्यारिची ।
गंगारसादि बहुत स्त्रीलिंगी सम संस्कृतीं ॥ १३ ॥

याविना शब्द भाषेचे पुंल्लिंगीच अपार ते ।
पारा थारा बरा तोरा घोंडा मेंडा खडा असे ॥ १४ ॥

इ–ईकारान्त पुंल्लिंगी सोंगी ढोंगी ह्मणोनियां ।
हत्ती सिपाई गोसामी चाटी तेली तथा गडी ॥ १५ ॥

कोष्टी कवाडी तांबोळी कासाटी ह्मणवोनियां ।
ऐसे कितेक असती यांविना सम संस्कृतीं ॥ १६ ॥

कवी हरी गिरी ऐसे पुंल्लिंगी शब्द फारसे ।
याविना शब्द भाषेचे स्त्रीलिंगीच अपार ते ॥ १७ ॥

पळी विळीही दगडी बुगडी पगडी असे ।
नपुंसक इकारान्तीं पाणी लोणी दहीं तिनी ॥ १८ ॥

उ–ऊस्वरीं जळू आणि ऊही स्त्रीत्वींच जाणिजे ।
झोंपाळूही भुकाळूही मायाळु त्रिक शब्द हे ॥ १९ ॥

गुरुबंध्वादि पुंल्लिंगी शब्द हे सम संस्कृतीं ।
याविना शब्द भाषेचे पुंल्लिंगीच बहूतसे ॥ २० ॥

लाडू चेंडू तथा झेंडू डाऊही वेळवादिक ।
अकारीं सर्व पुंल्लिंगीं उ जोडे रामु यापरी ॥ २१ ॥

पुंल्लिंगीच उकारांते शब्द फार ह्मणोनियां ।
ऊं स्वरीं शब्द भाषेचे अवघेच नपूंसकीं ॥ २२ ॥

सिंगरूं लेंकुरूं पिल्लूं इत्यादिक अनुस्वरीं ।
यकारीं न्याय ह्मणुनी पुंल्लिंगीं सम संस्कृतें ॥ २३ ॥

याविना शब्द भाषेचे स्त्रीलिंगीच समस्तही ।
भोय सोये साळे दाळे साय सूळें अशापरी ॥ २४ ॥

ये स्वरीं शब्द भाषेचे स्त्रीलिंगीच समस्तही ।
हे ते जे ही सवे बाहे वोहे पोहे अशापरी ॥ २५ ॥

यें स्वरान्तीं बोलिजेती जें तें भें हें अशापरी ।
सर्वही शब्द भाषेचे जाणीजेत नपूंसकीं ॥ २६ ॥

ओ स्वरीं बाइको स्त्रीत्वीं या शब्दावीण सर्वही ।
भाषेचे शब्द पुंल्लिंग ञ्ो घो चो लो वव्हो असे ॥ २७ ॥

अकारावरि बिंदूसी येक मात्रेसमेत तो ।
नाकें जनित भाषेत ऐं असा स्वर रूढला ॥ २८ ॥

त्या ऐं स्वरीं सर्व शब्द जाणिजेत नपूंसक ।
वेडें खेडें कुडें घोडें कोल्हें कुत्रें अशापरी ॥ २९ ॥

ऐ ऊ ये ओ अशा पंचीं हे तेरा लिंगबोधक।
यांविना असती दोनी आं ओं ह्मणउनी स्वर ॥ ३० ॥

धात्वव्यय विभक्त्यन्तीं बोलिजेती प्रशस्तसे।
आं हां आं हों आणि पां कां देवों येवों ह्मणोनिही ॥ ३१ ॥

देव्हारा देव तो लाभो यापरी स्वर हे द्वय।
न लागती शब्द लिंगीं प्रथमेस कदापिही ॥ ३२ ॥

येकून पंधरा ऐसे स्वर भाषा प्रकाशिते।
व्याकर्णांचे भाव येथें लिंगें जाणों प्रकाशिले ॥ ३३ ॥

न सांगतां पष्ट लिंगें समजूं येत यामुळें।
धाटी संगाविना छंद घडाया पादपूर्णीं ॥ ३४ ॥

ही आणीक कळों ऐसें जाणिजे म्हणिजेतसे ॥ ३५ ॥

॥ इति श्रीभाषाप्रकाशीं संकेतवर्ग संपूर्णमस्तु ॥ श्रीरामो जयति ॥

॥ वर्ग दुसरा ॥

* * *

# वर्ग तिसरा

श्रीगणेशाय नमः । दानवर्ग आरंभ ।
राखणावळि राखोळी राखावळि तसीचही ।
गुराख्याच्या मोइनेच्या देण्याच्या या त्रिधासिधा ॥ १ ॥

सेवेसीं सेवका देणें मुशाराणि मुशाहिरा ।
कर्ज वारूं दिल्या द्रव्य ह्मणावें रद्कर्ज तें ॥ २ ॥

परिटासी दिल्यां रुका ह्मणिजे ते धुणावळी ।
वैदिकां याचकां दान सवद्या मोल किंमती ॥ ३ ॥

नवऱ्या दीधल्यां हुंडा होय दानांग दक्षिणा ।
इच्छापूर्तीस जें देणें ह्मणिजे तेंच भातुकें ॥ ४ ॥

भत्ता भाते असीं दोनी देणीं हें जेवणास्तव ।
पोटासाटीं अर्पिलें तें पोटगी ह्मणिजेतसे ॥ ५ ॥

विद्यावंतासि उचित मोईना दरबारिच्या ।
डाइजा दीधल्या वांटा भेटी नजर राउळां ॥ ६ ॥

पत्रें दूरी देववणें ते हुंडी ह्मणिजेतसे ।
कामारियां मजुरी भीक ते भणगादिका ॥ ७ ॥

यतीश्वरासि अन्नादि दिल्या भिक्षा ह्मणोनि घे ।
धर्मेंवीण अकार्येंही दीधल्या दंड बोलिजे ॥ ८ ॥

धर्में संधीं वितरितां भुरी ते ह्मणिजेतसे ।
भाडेकऱ्यासि जें देणें तें भाडें ह्मणवीतसे ॥ ९ ॥

जकातीवालिया देणें ते जगाती ह्मणोनि घे ।
देतां गुन्हा क्षमा यासी गुनेगारी ह्मणोनि घे ॥ १० ॥

लाभासक्तीमुळें चौर्यें देणें तें लांच बोलिजे ।
हिशेबासी न ये तैसें फसकी ह्मणिजेतसे ॥ ११ ॥

वोवाळणी ह्मणवते आरतीकरितां दिल्या ।
त्रिकाळ घालणें मुंज्या देतां देवास काणकी ॥ १२ ॥

ह्मणिजे पोस्त दिधलें होळीच्या थंडकीस तें ।
उद्योगा नवरीसाटीं देतां ते बुडती कळों ॥ १३ ॥

देहंदगी ते ह्याकार देणें हें सामुदाइक ।
जें देणें रोख हातींच टिंचणें ह्मणिजे तया ॥ १४ ॥

हिशोबी रयतां देणें वार तो ह्मणिजेतसे ।
कारभारा नाम तोफा ऋण तें कर्ज बोलिजे ॥ १५ ॥

सीव्र घेणें अपत्रें तें उधार उसिणें दिलें ।
व्यवहार नफ्या देणें व्याज तेंचि कळांतर ॥ १६ ॥

शोभनीं कापडें देणें आहेर ह्मणिजे तया ।
बहुमानीं वस्त्र देतां तश्रीफ ह्मणिजेतसे ॥ १७ ॥

स्व–गृहीं दीधल्या वस्त्रें ते धडूती ह्मणूनि घे ।
वरा कन्येसवें द्रव्यें दिलीं तें ख्यात आंदणें ॥ १८ ॥

वाटें जेवों दिल्या वुत्ती ते सिदोरी ह्मणोनि घे ।
भूफला नेछुनी देणें भूदान निरुपद्रव ॥ १९ ॥

तें सर्वमान्य ह्मणिजे नाम त्याचें इनामही ।
देणें तें ह्मणणें येक तन्नामें बहु यापरी ॥ २० ॥

इति श्रीभाषाप्रकाशीं दानवर्ग समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ वर्ग तिसरा ॥

* * *

# वर्ग चौथा

श्रीगणेशाय नमः । शब्दादि वर्ग आरंभ ॥

मेघांचा शब्द वाद्यांचा शब्दही गडगडाट तो ।
सिंव्हाचा शब्द हुंकार आणिखी गडगडाटही ॥ १ ॥

हत्तीचा शब्द किंकाट घोड्यांचा हेपहीस तो ।
सामुदाई वानरांचा बोलिजे किल्किलाट तो ॥ २ ॥

रोधिल्या वानरीं शब्द कीचकीच ह्मणोनियां ।
आणीक त्यांच्या आक्रोशीं हुर्र ते गुरकावणी ॥ ३ ॥

कपींद्राचे भुभुःकार खरीं खेकाळु बोलिजे ।
कुर्कुरां घुर्घुरां शब्द अश्वलांचे कळोत ते ॥ ४ ॥

आक्रंदनीं हंबरडा गुरांचा, शिशुवांसही ।
ह्मणितल्या हुंबरडा गाईचा शब्द जाणिजे ॥ ५ ॥

मोराचा बोलिजे टाहो सर्पी भूस्कार चटचटे ।
सुण्याचे शब्द ते वस्वस् वळवळ कुइ भुंकणें ॥ ६ ॥

भालुचेंही भुंकणें तें कोल्ह्यांची होय हाक ते ।
काकध्वनी काव काव पाळीचा शब्द कुचुकुचू ॥ ७ ॥

कोंबड्यांची हाक तेचि त्रिकाळीं बांकही द्वयी ।
शेळयांचे शब्द ते में में अंत्रे ह्मणति वासुरें ॥ ८ ॥

मांजरीं गुर्गुरू म्याऊ शब्द कुर्कुर उंदिरीं ।
बेडुकांची किरकीर आणीकहि टरंटुरं ॥ ९ ॥

कोकिळांचे कुंज शब्द चिडयांचे शब्द चिंचिवा ।
गरुडाचा शब्द जो तो कृष्णा ह्मणुनि सांदतो ॥ १० ॥

कपोतीं व्हस्व अव्यक्त हुंकारु तो मनोरमू ।
पिंगळयाचा किल्बिलाट समूहीं तोच पक्षिया ॥ ११ ॥

गुंजारऊ आणि रुंजी झुंकारु भ्रमरध्वनी ।
विजेचा तो कडकडाट तोफांचा धडधडाट तो ॥ १२ ॥

हवायांची सरसर फटाक्यांमाजिं चट्फट ।
फुलबाणीं भर्भराट चुचुकारु चुचुंद्रिचा ॥ १३ ॥

चक्रबाणीं गररर बंदुखीं ध्वनि ठस्ठुसां ।
निशानाच्या फटकणीं उठे ते फडफड द्वयी ॥ १४ ॥

नाकांचा घडघडां शब्द घांटांचा घण्घणाट तो ।
शीतीं ठणत्कारु तीरीं सुस्साट्ट सण्सणाटही ॥ १५ ॥

पिसाऱ्यांचा भर्भराट कमानी कर्कराट तो ।
छेदनीं छट्छटा शब्द हत्यारांमाजिं खण्खणा ॥ १६ ॥

प्रवाहाची खळखळ ज्वालांचा शब्द भडभडां ।
तडतडां कडकडां आणि कडाडां मोडतें स्थळीं ॥ १७ ॥

प्रतिध्वनी दुमदुमी तुलॅं गा पडिसादही ।
शब्दें हदरल्या ठाईं उठे जो दण्दणाट तो ॥ १८ ॥

वायुलोटें उठे शब्द घुमारा ह्मणिजे तया ।
वेळवांच्या घिसणीचा कीचसा शब्द बोलिजे ॥ १९ ॥

प्राण्याच्या अंगसंस्पर्शें वस्तूचलनिं सँचलू ।
किंकळ्याचा कीच शब्द अर्डणें बहु विस्वरीं ॥ २० ॥

बालार्थ गातां योषेचा गीत पल्लव हल्लरु ।
दाटल्या कंठिचा शब्द गद्गदू ह्मणिजेतसे ॥ २१ ॥

हांसण्यामाजीं उठती शब्द ते खदखदा ही ही ।
घुंघुमाकारिचा शब्द प्रगटे दधिमंथनीं ॥ २२ ॥

नूपुरीं खुळखुळा शब्द घागऱ्यांमाजिं घुळ्घुळु ।
जोडव्यांचा रुण्झुणाट क्षुद्रघंटांत किण्किणा ॥ २३ ॥

कांकणांचा कणत्शब्दु पादुकांचा चटक् फटक् ।
वीणेयांचा झणत्कारु तुं तुं ही ह्मणिजेतसे ॥ २४ ॥

पडणें धब्धबा शब्दीं उडणें भुर्र बोलिजे ।
कुटितां धब्धुबा शब्द झडझडा झिटकावितां ॥ २५ ॥

धावण्याच्या रांगण्याच्या दडदडा दुडदुडा ध्वनी ।
अजा घंटे लुडुक् शब्द गजघंटारऊ खणिल् ॥ २६ ॥

ढण्ढणा शब्द तासाचा झल्लरी झण्झणाट तो ।
टखणाकिट टाळांचा चंगाचा शब्द चक्छका ॥ २७ ॥

खण्खणाटु मृदुंगाचा धों धों धन्धन दुंदुभी ।
पुइं शब्दु नागसरीं टमक्यामाजिं टिंटिमा ॥ २८ ॥

हदरवींते शब्द मोठे निधा तो तडकू तथा।
भं भं भों भों ध्वनी दोनी शंखीं कण्यांत ऊठती ॥ २९ ॥

तुं तुं तुतारियाभाजीं ढुं ढुं ढोलीं उठे ध्वनी।
यापरी अनुकाराचे शब्दसंघ अपार ते ॥ ३० ॥

घोक नादु घोषु शब्द आवाजहि अवाज तो।
अगाजा हे आदि शब्द दों लिंगीं बोलिजे ध्वनी ॥ ३१ ॥

समूही शब्द हे आठ सम संस्कृत प्राकृत।
उछ्वांचा शब्दमेळ कोल्हाळ गजरू तथा ॥ ३२ ॥

वाद्यांचा शब्द अधिकु गजरू ह्मणिजे तथा ॥ ३३ ॥

इति श्रीभाषाप्रकाशीं शब्दादि वर्ग चवथा समाप्त ॥ ४ ॥

॥ श्रीकृष्णाय नमः ॥

* * *

## वर्ग पांचवा

श्रीगणेशाय नमः । तद्वर्ग आरंभ ॥

सरस्वती बोलियेली जे महाराष्ट्र वैखरी ।
तीमाजीं शब्दपर्याय बोलिजेताति सांप्रत ॥ १ ॥

बोलतों शब्दही तोचि वाचा ते आणि वैखरी ।
मात ते गोष्टि ते बोली भाक ते भाष भाख ते ॥ २ ॥

गोठी ते ग्रातु ते आणी बोलु तो कवळुहि तो ।
जाणिजे कादिपंग्तींचा भाव तो कवळू असा ॥ ३ ॥

गिरा तेचि जबाही ते वाचेचे भेद यापरी ।
वाक्येंही वचनेंही ते वाणीही सम संस्कृतीं ॥ ४ ॥

खरें तें बोलणें साच सत्यही सन संस्कृत ।
साचार आणि निरुतें निकेंही ह्मणिजे फुडें ॥ ५ ॥

साचोकारहि सावाव यथार्थ ह्मणिजेतसे ।
लबाड लटिकें वाव असाचहि असत्यही ॥ ६ ॥

लुबाडी आणि लाबाड वावाचे भाव दोनिही ।
सप्रचीत रुजू वाक्य असंगत असंगडें ॥ ७ ॥

मागुतें मागुती आणी पुन्हाही परतोनिही ।
दीनत्वें जाच कथणें गाऱ्हाणें ह्मणिजेतसे ॥ ८ ॥

जाचणीचा सूड घेवों सांगणें जे फिरादि ते ।
भाषणें भाकणें दीन वाचेचें ह्मणिजेतसे ॥ ९ ॥

बोभणें आणि बोभाणें ऐसें तें घट्टि बोलणें ।
बोलायाची पद्धती जे तीयेतें ह्मणिजे ह्मणी ॥ १० ॥

पाल्हाळ बोलणें खोल्वीं वल्गना ह्मणिजेतसे ।
वंचनार्थीं बोधणें जें ह्मणिजे तेंच भोंदणें ॥ ११ ॥

स्वार्थीं स्तउनि आशेते दावणें फूस लावणें ।
स्थळोस्थळीं भेदरूपें भाषांचे धर्म यापरी ॥ १२ ॥

उळवाची उक्ति गूढी रड तापत्रयोक्ति ते ।
अव्हासव्हा अडावेडा बोली तेचि असंगत ॥ १३ ॥

सिक सिक्षा सिकवणें शिक्षणें सिक लावणें।
ग्रंथीं पारायण असे म्हणिजे जपणें जपीं ॥ १४ ॥

सिकणें तेंचि पढणें गेंगाणें अनुस्वरीं।
उच्चारणें घडी घडी घोंकणें तसें ॥ १५ ॥

पत्तेपत्तून ह्मणतां तेंच तें आणिकाणिक।
प्रतिज्ञा–वाक्य शफत होडही ह्मणऊनि घे ॥ १६ ॥

नवाजणें वानणें तें रोषें तुछोक्ति सिडफड।
भाक भाष अशा शब्दीं भरोसा ह्मणिजेतसे ॥ १७ ॥

नाभिकारु अभय वाक् शिव्यांचे धपकार तें।
भार्टाये आरतीमाजीं रूढले जयकार ते ॥ १८ ॥

रहस्योक्ती गुजगुज गर्जणें तेंच कडकणें।
भला शाबाशही ऐसें आदरीं ह्मणिजेतसे ॥ १९ ॥

घिगावणी काकुलती रिझावण खुषामती।
बोलणें जें कुचकुच कुनिष्टार्थीं बहू हळू ॥ २० ॥

बुझावणी जाणवणें जाणिजे समजाविसी।
विनंती विनवणी विनतीहि ह्मणऊनि घे ॥ २१ ॥

विनयें मागणें तेंचि अरजू अर्जही तथा।
अर्जीही ह्मणिजे तेचि निजापेक्षित पत्रिका ॥ २२ ॥

आर्षा अरुष बोलावें प्रौढ प्रहुड जाणिजे।
भ्रांतीचें तें बरळणें बहुत व्यर्थ बडबड ॥ २३ ॥

अनन्वयहि जें वाड तेंचि बडबड बोलिजे।
बोधणें तें सिकवणी धुधुकारु निरास्पद ॥ २४ ॥

दाटा दबावणी आणी दाबणी ह्मणिजेतसे।
रळी तेचि मस्करी ते ते विनोद ह्मणोनि घे ॥ २५ ॥

फजीती तें हंसें हांसें तुच्छोक्ती ते उडावणी।
थांब शब्दें राहवणें तैसेंचि सेडसावणें ॥ २६ ॥

चट गोष्टी चाट गोष्टी टवाळया ह्मणिजेत त्या।
टक टवाळी ह्मणितल्यां टवाळी सांग पद्धती ॥ २७ ॥

वासणेंही बोसणणें बोभाणें नीदवैखरी ।
उणेंदुणें उणीदुणी मत्राळ भृदु बोलणें ॥ २८ ॥

चापचोपहि खडीत विस्तारें बोल चोंकस ।
कार्याची घटना जें ते ठाकठीक ह्मणोनि घे ॥ २९ ॥

बोलणें जें गुणगुण कांहीं प्रगटलें तसें ।
आणीकही गुणगुण बोलों शक्य नव्हे तसें ॥ ३० ॥

अनोच्चारी पुटपुट नेटें गडगडीतही ।
व्यर्थ बोली वटवट वाउगी व्यर्थ बांकडी ॥ ३१ ॥

अन्याचें सांगणें क्षुद्र तें चाडी ह्मणवीतसे ।
वर्णोच्चार नव्हे नीट गोठी ते होय बोबडी ॥ ३२ ॥

येकेक वर्णीं तटणें तोतरें बोलणें तसें ।
नीट जिव्हा न वळतां त्वरेची गोष्टि चावळी ॥ ३३ ॥

चवळी लटकी गोष्टी जें अचंबाच कल्पिली ।
चवळीचें प्रेरणें जें कापणें ह्मणिजे तथा ॥ ३४ ॥

चाउटी चौंपरी चर्चा भंड तें भंडभूतची ।
येकाचें येक ह्मटल्यां अन्यथा भाव जाणिजे ॥ ३५ ॥

तैसेंच कांहिचें कांही कांणोवांणोहि बोलिजे ।
प्रत्युत्तरीं होय जाब आणि उत्तरही सम ॥ ३६ ॥

गोष्टी वाढवणें जें तें वाधांग ह्मणिजेतसे ।
बोलांचा जेथ विस्तार पाल्हाळ ह्मणिजेतसे ॥ ३७ ॥

निकुराचें बोलणें जें ह्मणीजे त्यासि निष्ठुर ।
लावालावी असा शब्द कल्हो जेणें परस्परीं ॥३८ ॥

इष्टालापु सौख्यवाद संवादु तत्त्व बोलणें ।
वितंडवाद वेवाद सैरा वाढवणें गिरा ॥ ३९ ॥

वैरें न बोलणें तेंची अबोल ह्मणिजेतसे ।
परस्परीं निष्ठुरत्वीं बोलाबोली ह्मणोनि घे ॥ ४०॥

बोलणें सर्वसामान्य भूतादि वृत्त सांगणें ।
साहित्यादीक करणें परामर्षीं विचारणें ॥ ४१ ॥

पत्रिकेचें वाचणें तें वेदादि पठणें तथा।
ह्मणावें स्तोत्र करणें तैसेंचि काव्य घोकणें॥ ४२ ॥

कथेतें करणें आणा गोंधळादिक घालणें।
गीताचें होय तें गाणें वाचानियत धर्म हे ॥ ४३ ॥

विचारणें हटकणें पुसणें पूसणें तथा।
पुसी पृच्छा ह्मणवते प्रश्न जो तोच पूष्णही ॥ ४४ ॥

बोलावणें बाहणेंही आणि पाचारणें तथा।
बोभावणेंहि ह्मणिजे त्यापरीच बलावणें ॥ ४५ ॥

ह्मणीतल्या आळवणें प्रीतीचें तें बलावणें।
उच्च स्वराचें तें हाक फोडणें हाक मारणें ॥ ४६ ॥

नसे नाहीं नाट नाथी नाटंटा पूज्यभावही।
ऐशा प्रकारिचे शब्द नास्तिक्यार्थीं प्रवर्त्तले ॥ ४७ ॥

नव्हे नोव्हे निषेधार्थीं न्यासार्थीं होय बोलिजे।
आहे आथी असे ऐसीं तीनी आस्तिक्य बोलणीं ॥ ४८ ॥

गलबा गल्बला गुल्ली हकाटाहि हाकाटही।
शब्दसंघ मिळे तेथें बोभाट गल्गलाटही ॥ ४९ ॥

बडंबाही गलबला हहक्कारु हकारुही।
गजणें गाजणें आणि गर्जणें घोषणें तसें ॥ ५० ॥

ह्मणीतल्या कुलुलुलु अनर्थाचा हाकाट तो।
प्रार्थुनी बाहणें देवा धावा त्याप्रति बोलिजे ॥ ५१ ॥

पोखारणें पोखरणें धावा गाण्यासि बोलिजे।
भकणें संगतीवीण चाथी निःसार वैखरी ॥ ५२ ॥

चरित्रें राजयाचीं जें पवाडे ह्मणिजेल ते।
कथा पुराणिंच्या गोष्टी गाथा त्या येर काहण्या ॥ ५३ ॥

अंतिच्या आंतिचा बोल फांटा त्याप्रति बोलिजे।
अपवादार्थ जाणावे तंटा बोभाट दोनिही ॥ ५४ ॥

टाळी पिटे अकीर्तीची टाळोरा ह्मणिजे तिये।
साच होवाव हो मात प्रगटे दाट जे जनीं ॥ ५५ ॥

अवाइ ते होय बोली मिथ्या गमतिची गफ।
गाजावाजा आणि वाजू प्रवादु ह्मणिजेतसे ॥ ५६ ॥

टेहणी-टोवणी दोनी इंगणी हटकोनियां।
टाकुनी बोलणें तेंचि ह्मणीजेत निखंदणें ॥ ५७ ॥

कुतिष्ट मागिलें उक्त उखाळी ह्मणिजे तया
सिफारसी सहायोक्ती हे जीवीं साम बोलणें ॥ ५८ ॥

अबद्ध बोलि ते होय जींत अर्थ बुडे तसी।
ह्मणीतल्यां साळढाळ जाणिजे सहज स्थिती ॥ ५९ ॥

वाचाळी ते शब्द पाळी शिवी गाळी अवाक्षर।
लांचावतां भीडबोल लाभा गोभा कळो तसा ॥ ६० ॥

वेद वेदुहि शाखाही शब्दब्रह्म ह्मणोनि घे।
त्रिमात्रा प्रणऊ तोचि वोंकार आदिबीज तें ॥ ६१ ॥

चर्चा प्रस्ताव प्रस्ताप प्रसंगु तीचि चारणा।
अचागळी अबाजावा उणीवा तुच्छ बोलणें ॥ ६२ ॥

यश तें यश तें आणी येस तें नाम नांव तें।
नामोशा आणि नामाही कीर्तिही सक्रियेमुळें ॥ ६३ ॥

विजयें बोलिजे फत्ते फतेही जस जैतही।
भलत्या रीति बाहुल्यें प्रसिद्धी ख्यातिही तथा ॥ ६४ ॥

अभिधान पदार्थाचें बोलिजे नाम नांव तें;
दुर्दशा ते अपख्याती अपकीर्त्ति अपेशही ॥ ६५ ॥

बोलाया योग्य तो भाव सापेक्ष वदिजे असें।
ह्मणोनी प्रार्थिते टाईं बोली जो ह्मणिजेतसे ॥ ६६ ॥

गाजणें वाजणें दोनी शब्द होण्यास बोलिजे।
ह्मणीतल्या वरडणें मोठ्यानें हाक फोडणें ॥ ६७ ॥

थरोळीही हरोळी ते दोनी आवेश गर्जना।
चेपतां कंठ भीतीनें निघे ते ध्वनि किंकळी ॥ ६८ ॥

विलाप तो विलपणें ज्वरें क्रंदन हुंबणें।
कणणें तें विळवणें दुःखेंकडुनि कुंथणें ॥ ६९ ॥

यथार्थ आणि तुटकें बोलणें तेंच खंडित ।
हाकारणें ह्मणितल्या दूरिलीयासि बाहणें ।। ७० ।।

कांटाळवाणा जो शब्द ह्मणिजे त्यासे टकटका ।
तुसड्याचा त्रास देता शब्द तो होय वस्वस ।। ७१ ।।

अहाहाही अरेरेही खेदकारक शब्द ते ।
जांफारणें ह्मणितल्या शब्दें,घेरून बोलणें ।। ७२ ।।

निंदासंयुक्त जो शब्द स्त्रीलिंगी तेचि मर्मर ।
ह्मणीतल्या अललल उत्साहाधिक्य शब्द तो ।। ७३ ।।

।। इति श्रीभाषाप्रकाशीं वाग्वर्ग संपूर्णमस्तु ।। श्रीकृष्णाय नमः ।।

* * *

## पुर्वणी

भाकडा निष्फला गोष्टी संस्कृता त्याचि सौंस्कृता ।
संवस्कृतहि बोलावें प्राकृतालागि प्राकृत ।। ७४ ।।

ह्मराटें बोलणें जें तें ह्मराष्ट ह्मणिजेतसे ।
महाराष्ट्रहि बोलावें तेलंगें आंध्र जाणिजे ।। ७५ ।।

अरवें तेंचि तिगळें कानडें कनडें तथा ।
हिंदुस्थानी रजपुती गुर्जरी गुजराति ते ।। ७६ ।।

यवनी तुरुकाणी ते जातिभाषा अशा बहु ।
विशेषें चांगला वाद तो विसंवाद जाणिजे ।। ७७ ।।

प्रेमें गद्गदिता हाके गदारोळ असी ह्मणी ।। ७८ ।।

## वर्ग सहावा

श्रीगणेशाय नमः ॥ संख्यावर्ग आरंभ ॥
प्रसिद्ध नामें संखेचीं असती तें अनेकधा ।
त्यांमाजीं भेद पर्याय बोलिजेताति आइका ॥ १ ॥

येकी विषम संख्या ते बेकी ते समता कळो ।
येकठ्ठा येक मिळणी येकत्र ह्मणिजेतसे ॥ २ ॥

येक त्रिकीं येकु तोची आणि येकट येकली ।
येकी ते प्रथमा स्त्रीत्वीं बहुत्वीं होय तैसिच ॥ ३ ॥

जनपर्याय आल्यानें जण संखेवरी जुडे ।
दंद जोडी आणि जुग जोडनासें युगाप्रती ॥ ४ ॥

आणीकही पुढें होय ह्मणिजे जावळें दुल्हें ।
ह्मणीतलीयां दुपट दुबारा जाणिजेतसे ॥ ५ ॥

दुई दुगुण संख्या ते दुणा दूणी दुणें त्रिकीं ।
दोनीचा मेळ तो लोकीं दुकट्ट ह्मणिजेतसे ॥ ६ ॥

दुवां द्वां यापरी बोली दों ऐशा बोलिजेतसे ।
दोवे दोघी आणि दोघें लोकीं पुं स्त्री नपूंसकीं ॥ ७ ॥

तीवरी चौवरी लिंगीं घत्रिधा ये तयापरी ।
दोघें ह्मणति ये ठाईं दोहेही ह्मणिजेतसे ॥ ८ ॥

त्रिवार मेळ तिपट तीगुणी ह्मणिजे तिई ।
जें तीनि संखे पावेतों त्यातें तिवर बोलिजे ॥ ९ ॥

तीनीचा मेळ तिरुख त्रिकही तीहि बोलिजे ।
शून्य बिंदू बिंदकुलें पूज्यीं मेडकुलें तथा ॥ १० ॥

तीं संबंधीं तिवई ते चौंचा संबंध चौकिये ।
चौं चऊं चहुं या शब्दीं च्यारी ऐशास बोलिजे ॥ ११ ॥

च्यारीचा मेळ जो त्यातें च्योकसे ह्मणिजेतसे ।
येकाकारें च्यारी तेथे बोलिजे चौक चौकट ॥ १२ ॥

चंपा आणीक चांपाही च्यारीचा मेळ बोलिजे ।
पांचाचा मेळ पुंल्हिंगीं नव्हे तेथेंचि पंचक ॥ १३ ॥

पुल्लिंगीं मेळ पांचाचा पंज पंजाहि बोलिजे ।
पंचकीं जन पर्यायीं पंच्याइलति पंचही ॥ १४ ॥

साहाचा भाव साष्के सस्गाणीं स्त्रीपणीं कळो ।
सख सख्ख ह्मणोनीही सक्कही होय षटक तें ॥ १५ ॥

सातरी सत्तका नांव अठ्ठा अष्टक जाणिजे ।
नवांचा मेळ नवक दसको दशकार्थ तो ॥ १६ ॥

पावला पांव चौथाई दुपाव ह्मणिजे निमें ।
निमेंही अरधें अर्धें अर्धेंही ह्मणिजेतसे ॥ १७ ॥

रुपायाचा पाव तोचि पावला ह्मणिजेतसे ।
रुक्याचा अरधा भाग अडका ह्मणिजे तया ॥ १८ ॥

रुक्याचा पाव तो पैका मणाचा पाव तो धडा ।
टक्याचा पाव ते रेघ बारा रुक्के ह्मणोनिही ॥ १९ ॥

फलमाचा पाव तोचि पातका ह्मणिजेतसे ।
फलमाचा निमा भाग तो अड्डा ह्मणवीतसे ॥ २० ॥

चकऱ्याचा निमा भाग ह्मणवी ते प्रताप ते ।
होन्नाचा पाव धरण निंमा भाग प्रताप ते ॥ २१ ॥

पैशाचा भाग अरधा अधेला ह्मणवीतसे ।
फळादिकांची चौथाई चतकोर ह्मणूनि घे ॥ २२ ॥

जयाचेथें पाव उणा तो पौउणा पाउणा तथा ।
पावल्यासी येक सव्वा निंम्यासी येक दीड तो ॥ २३ ॥

असल्यां दोंवरी निंमे अडीच ह्मणिजे तया ।
तीनीपासुनी वरिलें अर्धें साडे ह्मणोनि घे ॥ २४ ॥

सव्वाई भाग तो सव्वा दुणावो दोनि मीळता ।
तिजाई तीसरा भाग चौथाई चवथा तथा ॥ २५ ॥

आठवा भाग जो त्यातें आठोवा ह्मणिजेतसे ।
दाहवा भाग जो त्यातें दाहिजा ह्मणिजेतसे ॥ २६ ॥

हिशोबीं वांटिला अंश हिस्सा वांटाहि भाग तो ।
आतां सुमार संख्या ते सगळी सरळी वदूं ॥ २७ ॥

पांचव्याहुनियां नउ तों प्रत्ययें प्रथमे सवा ।
दाहवीया पासुनी शां भागार्थीं वरि ये अवा ॥ २८ ॥

अस्तव्यां तीवरी अर्थे साडेतीनाहि औट तें ।
च्यारी सत्रा शंभरी हें बहुतीं उपलक्षणें ॥ २९ ॥

आदिलें पहिलें आणि प्रथमू पर्थमू पर्थं ।
विजें तें दुसरें दुसें दुजेंही ह्मणिजे तथा ॥ ३० ॥

तिसें तिजेंही तिसरें तिवनें ह्मणिजेतसे ॥
चहुवें चवथें चौथें चउयें चौथवें तथा ॥ ३१ ॥

चौथवेंही ह्मणिपतें पांच सा सतया सिवें ।
नपुंसकीं रीती ऐसी स्त्रीत्वीं वी प्रत्ययो घडे ॥ ३२ ॥

येक आदी दोन दोही वेही दोनीस बोलिजे ।
विशेष्या पुढिले भागीं दोच्या अर्थीं दुकारु ये ॥ ३३ ॥

तीनही तीनिही तीही च्यारीही चउंही तथा ।
पांच पांचहि सा वेती साहाही ह्मणिजेत तें ॥ ३४ ॥

साता सातचि ये बोली आठा दोश्चोक बोलिजे ।
णौ नऊ णउही नौही नवही दसधा दहा ॥ ३५ ॥

आठ दों येक णौ सा चौ पांच पांचहि सात तो ।
दाहाचा मेळ जो त्यासी दसकू ह्मणिजेतसे ॥ ३६ ॥

अक्करा अकरा अक्रा वारा वेसक बोलिजे ।
वारांचा ज्यासि संबंध बारसें ह्मणिजे तथा ॥ ३७ ॥

चवदा चउदा चौदा पंध्रा तैसेंच पंधरा ।
सोळा ते सोवळा सौळा सत्रा आणीक सत्तरा ॥ ३८ ॥

सतरा अठरा अठ्रा अठराही विरूढले ।
यक्कोणीस यक्कुणीस तथा यक्कुणवीसही ॥ ३९ ॥

येकाउणें वीसही ते वीसही ईसही तथा ।
यक्केवीस येकवीस वेवीस आणि बाविस ॥ ४० ॥

पंचेवीसाप्रती नाम पंचवीस ह्मणोनिही ।
येकतीस यक्कतीस सत्तीस सदतीसही ॥ ४१ ॥

च्याळ च्याळीसही यकेताळीस येकेताळिस ।
सत्ताळ सत्तेताळीस अठ्ठेताळ उताळिस ॥ ४२ ॥

पन्न पन्नासही आख येक नामीं न बोलिले ।
सत शंभरि शें शें हें दाहाशें हें हजारही ॥ ४३ ॥

लक्ष लाखहि जे कोटी कोडी क्रोडि करोडही ।
शंभरावरिले आख उत्तर्षे ह्मणिजेत ते ॥ ४४ ॥

दोनिशापासुनी आखा ओत्तरं दोनि तीनिही ।
यापरी प्रत्ययो चौशावरी येकादिहे क्रमें ॥ ४५ ॥

येकून येक जे तेही येकंदर तमामही ।
बहु बहुतही फार उदंडहि अपाडही ॥ ४६ ॥

उमापही वहुवस सवंग बहुसाळही ।
अनेक आणि उदंड असूपहि अमापहि ॥ ४७ ॥

थोडकें थोकडें टाचें थोडेंही थेकुलें जरा ।
स्वल्पही सम गीर्वाणीं मोटकें अळुमाळही ॥ ४८ ॥

नपुंसकावीण लेखा लेख पुंसक जाणिजे ।
नपुंसकीं गणित तें आहे गणनही तसें ॥ ४९ ॥

स्त्रीलिंगीं गणती आणी गणनाही तसीच ते ।
तो हिशोबहि ते संख्या ते ठीकी मवणी कढे ॥ ५० ॥

मोजणें मोवणें आणि मेजणें मापणें तथा ।
असो अपाड ते आतां संख्या हे स्वल्प सूचिली ॥ ५१ ॥

॥ इति श्री संख्यावर्ग संपूर्णमस्तु ॥

॥ श्रीरस्तु ॥

* * *

## वर्ग सातवा

श्रीगणेशाय नमः ॥ भाषाप्रकाशीं रूपादि वर्ग आरंभ ॥
सुरूप रूपस तथा चांग चांगटही त्रिकीं ।
चंगलें तें चांगलेंही चंगही ह्मणिजे तया ॥ १ ॥

सुरेखही त्रिकीं चांग अपरूप अपूर्वही ।
ह्मणीतल्या सुंदरसें स्त्रीलिंगीं समसंस्कृत ॥ २ ॥

नेटकें बरवें लेसें बरेंही नीट ठीक तें ।
चोख चख्खोटही भलें युक्तोत्तम समत्रिकीं ॥ ३ ॥

सरसीं चांगला भाव रसिकत्वहि बोलिजे ।
चांगावें तें बरव ते चांगूलपण जाणिजे ॥ ४ ॥

आंगलोटहि आंगोठा आंगलक्षण तें कळो ।
साजें जें शोभतें तैसें साजिरें ह्मणवे तया ॥ ५ ॥

गोजिरें ह्मणिजे ऐसें कीं नाजूक चांगलें ।
कोडीसवाणें तें ऐसें चांगलें कौतुकार्ह जें ॥ ६ ॥

दिसाउ ह्मणिजेताहे चांगलें उदरांगही ।
देहीं उद्रांग थोराड धिंगही उंच दवेंड ॥ ७ ॥

गोरें उजळही आणी गोरेंपान विशेष तें ।
काहीं काळें उजळही सावळें ह्मणिजे तया ॥ ८ ॥

गोमटें लालना योग्य नवन्याचेंहि चांगलें ।
निसे असुरता जेणें रूप तेंचि निमासुर ॥ ९ ॥

भयहतें चांगलें तें विष्णुरूप निमासुर ।
अक्राळ आणि विक्राळ भ्यासूरहि भयासुर ॥ १० ॥

मांडलें मंडलें तें जें मान्य विख्यात शोभलें ।
बोकें लाठे मोटे गंडें गुबच्या धष्टपुष्टही ॥ ११ ॥

रोडकें कातलें रोड नेमस्त सडपातळ ।
खुजें तें डुबरें गिड्डें रेजा चटकणें तथा ॥ १२ ॥

कुरूप तेंच विदरें कुबजें कुब्डें कुन्हें ।
रूपें सजीव ऐसीं हें आतां सामान्य आइका ॥ १३ ॥

तापोक्ती चांगलें व्यंग चांगलें भलतें सुधें ।
आकार बांधा तें ठेव उभारा तो उभारणी ॥ १४ ॥

पांढरें ढवळें आणी पंढरें भुरकें फिकें ।
तांबडें तांबडें लाल रात तांबुसहि तामटें ॥ १५ ॥

भगवें हुरमोजी तें पाटलीवर्ण जाणिजे ।
मोट्टें मोटें थोर शोलें ढिसाळहि विशाळही ॥ १६ ॥

धाकुटें धाकुलें सानें धाकुटें आणि थेकुटें ।
चिमणें चिमकें आणी थेकुलें ह्मणिजेतसे ॥ १७ ॥

त्रिकें स्वरीं हें लाहन नित्येकवचना व्यय ।
लांब तें दीर्घ दिरुघ लांबी तद्भाव जाणिजे ॥ १८ ॥

अखूड कोतें लाडेंही ऱ्हस्व तें रास जाणिजे ।
रुंदाचा भाव ते रुंदी नव्हे रुंद निरुंद तें ॥ १९ ॥

विशाळ भीकरा नाम वितंड म्हणवोनियां ।
अवघें अघवें औवें सारें समंदेंहि आशिकें ॥ २० ॥

समुदें असकें अस्कें सर्वांग्दी सगळें तथा ।
भोवऱ्यासारिखें काळें काळेंभंवर तें कळो ॥ २१ ॥

शङ्खसमान जें शुभ्र पांढरेंखड बोलिजे ।
गुंजे ऐसें तांबडें तें तांबडेंगुंज बोलिजे ॥ २२ ॥

उजाळ तेंचि भडक मळकें मकमकीत तें ।
वांकुलें वांकडें वक्रीं चांग जें तेंचि वेंकट ॥ २३ ॥

इति रूपादिवर्ग समाप्त

* * *

## वर्ग आठवा

श्रीगणेशाय नमः । कालवर्ग आरंभ ॥
निमिष्यापासुनी काळ महाप्रळय तोंवरी ।
उत्पत्ति स्थिति संहारा जगाच्या ठाव काळ तो ॥ १ ॥

सावकाश नव्हे तैसा काळ तो नांव बोलिजे ।
ह्मणीतल्यां नाव ऐसें क्षणही जाणिजेतसे ॥ २ ॥

नेत्राचें पातया पातें लागतांचि निमिष्य तें ।
पुल्लिंगीं तोचि पलकू अठ्रा पलक जाहल्यां ॥ ३ ॥

काष्टा ह्मणुनि ते वेळ त्या काष्टा तीस तैं कला ।
तीसा कलांचा क्षण तो त्या बारांचा मुहूर्त तो ॥ ४ ॥

पंध्रा मुहूर्त अमरकोशोक्त दिन येक तो ।
आणीकेक परी रूढी सिवालिखित पद्धती ॥ ५ ॥

पौणेच्यारी घडीचाही मुहूर्त ह्मणिजेतसे ।
साटी अक्षर उच्चार काळ तो पळ जाणिजे ॥ ६ ॥

साटी पळाची घटिका घटका ह्मणवे घडी ।
नपुंसकीं पानवळें घडियाळें ह्मणूनियां ॥ ७ ॥

जल घडीभरसा पात्राचें नांव जाणिजे ।
अडीच घडिचा तास ते बारा दिवसाप्रती ॥ ८ ॥

तीं तासां येक पाहरु प्रहरू पार बोलिजे ।
सकाळ शब्द दों लिंगीं त्यापरीच पहाटही ॥ ९ ॥

अरुणोदय वेळा जे तेही पाहाट बोलिजे ।
पाहाटे पूर्विले भागीं जेव्हां धुंदुक दीसतें ॥ १० ॥

तैसी वेळा झुंजरुक स्त्रीलिंगीं बोलिजेतसे ।
तमा वोहटती वेळ भानु भानुप्रवेशती ॥ ११ ॥

झुंज शब्दें मंदरुक करते झुंजरुक तैं ।
प्रभा आतलिया पाठीं स्त्रीलिंगींच प्रभात ते ॥ १२ ॥

मध्यान काळ तो आणि स्त्रीलिंगींच दुपार ते ।
सांज ते ह्मणिजेताहे तो साइंकाळ बोलिजे ॥ १३ ॥

संध्याकाळु तिनीसांज प्रदोष रयनीमुख ।
पाहाटेपासुनी सांजे त्रिकाळीं सांज बोलिजे ॥ १४ ॥

देहा दिहा दिवस तो ह्मणिजे दीस तो दिवे ।
राति रात्री णिशा स्त्रीर्ल्वी ह्मणिजे रयनी तथा ॥ १५ ॥

रात्रीं दुपारवेळा जे ह्मणिजे अर्धरात्र ते ।
अर्धा रात्रीस वरुती बोलिजे अपरात्र ते ॥ १६ ॥

तीन प्रहर वेळा जे बोलिजेल तिपार ते ।
तृटीचा काळ चीटकी बायणी वाइदा गडु ( ? ) ॥ १७ ॥

रात्री दिवो मिळुनिया बोलिजे ते अहिर्णिशी ।
चांदिणी चांदणी रात्री काळोखी कृष्णपक्षिची ॥ १८ ॥

आद्या तिथी प्रतिपदा तीजसी तीथि चौवरी ।
असती द्विविधा नामें सम प्राकृत तें कथूं ॥ १९ ॥

आद्या तिथी पाडवा तो द्वितीया बीज जाणिजे ।
त्रितीया तीज बोलावी चतुर्थी चौति जाणिजे ॥ २० ॥

यावरी तिथि धा येका येका नामीं न बोलिल्या ।
पंधरावी शुक्लपक्षीं पूर्णिमा ते पुनीवही ॥ २१ ॥

कृष्णपक्षीं अमावाश्या तैसी अंवस बोलिजे ।
या दो पक्षीं येक मास महिना आणि माहे तो ॥ २२ ॥

त्रितीया अक्षयाख्या जे अखती अखतीज ते ।
आषाढ भाद्रपद यां नामें आखड भादवा ॥ २३ ॥

आश्वीन महिन्यालागी नाम आस्वीन बोलिजे ।
मार्गशीर्षा प्रतीनाम मार्गेशिर ह्मणोनियां ॥ २४ ॥

पुष्य नामें पूंस आणि माघ माहो ह्मणोनि घे ।
शून्यमासू अधिक तो धोंडाही ह्मणवीतसे ॥ २५ ॥

येर मासांप्रती नामें संस्कृतेंचि यथापरीं ।
दो मासांचे ऋतु रुतू सा प्रसिध्द संवस्कृतीं ॥ २६ ॥

उष्णकालासि ह्मणिजे उन्हाळा ह्मणवोनियां ।
वर्षाकाळू पाउसाळा हिवाळा हिमकाळ तो ॥ २७ ॥

हंगाम फलकाळू तो गैरहंगाम निष्फल ।
अकाळही तोचि हो यथाकाळचि काळ तो ॥ २८ ॥

तत्त्व.ऊरि ह्मणिजे काळाकाळ ह्मणोनियां !
पर्वकाळू पुण्यकाळू स्नानदानासि योग्य ते ॥ २९ ॥

सुकाळू चांगला काळ बरवें ज्यांत पुष्कळ ।
दुकाळु दुकळू ऐसें क्षामकाळासि बोलिजे ॥ ३० ॥

दों काळीं मिळते ठाईं बोलिजे संधिकाळ तो ।
प्राकृतीं रूढसे येथें जे तेचि काळ बोलिले ॥ ३१ ॥

आदित्यवार अइत गुरुवार बरस्पती ।
शुक्राचा तो शुकर्वार शनीचा सणवार तो ॥ ३२ ॥

ग्रह नामें येर वार सोम मंगळही बुध ।
सा मासां येक अयन तें वर्षा दक्षिणोत्तरें ॥ ३३ ॥

वरुष तें वर्ष वरस सालही तें वरीस तें ।
आपुल्याल्या बहु वर्षं प्रमिती घडती युगें ॥ ३४ ॥

कृत त्रेत द्वापरही कळी म्हणुनि च्यारि ते ।
त्या त्याच्या वर्षसंख्या बोलियेल्या संवस्कृतीं ॥ ३५ ॥

युगासी जुग बोलावें चौं युगा येक चौकडी ।
संस्कृतीं ख्यात नामें तें काळ येथें न बोलिले ॥ ३६ ॥

दिनमान अशा शब्दीं दिवसाचें प्रमाण तें ।
प्रतिक्षण प्रतिघडी क्षण क्षण घडी घडी ॥ ३७ ॥

अवावकाश आणीक ह्मणिजे तो उसंतही ।
उश्वासवेळ प्रमिती उसंत ह्मणिजेतसे ॥ ३८ ॥

विळंब उशिरू आणि दीर्घकाळ दिरंग तो ।
वाडखोळहि आणीक ह्मणिजे वाडवेळही ॥ ३९ ॥

स्वकार्या फावली संधी परावे निर्बळी जई ।
प्रयत्नें साधितां कार्य वेळ ते वैल बोलिजे ॥ ४० ॥

वेगोवेगीं जाहलें तें वेगोवेग ह्मणूनि घे ।
वेळ वेळा अवसरू समयो काळही तथा ॥ ४१ ॥

सावकाशु काळवश ते काळगति तो तथा ।
तीव्रता तातडी आणी जलदी ह्मणिजे त्वरा ॥ ४२ ॥

इल्का उशीर महोळ केह्रोळ कितिवेळ ते ।
तितुकी वेळ तेह्रोळ जेह्रोळ जवं वेळ ते ॥ ४३ ॥

अयुक्तही रिकामीही वेळ जे अडवेळ ते ।
वाउगा काळ वेकाळ अकाळू तो अवेल ते ॥ ४४ ॥

चालता दुसरा तिसा चवथा या चऊं दिसां ।
आजि उद्याही परवां तेरवां बोलिजे क्रमें ॥ ४५ ॥

अव्ययें काळपर्याय ते आतां बोलिजेतिल ।
तेथे समयही वेळ काळ अंतर ना व्ययें ॥ ४६ ॥

सामान्य काळ येरवीं ते दीसीं ह्मणिजे तधीं ।
तैं तईं तेधवां तेव्हां ते काळीं तवं तों तदा ॥ ४७ ॥

तैंच तेव्हांच तत्काळ सवेंच ह्मणिजेतसे ।
प्रस्तूत आतां ये काळीं येधवां ह्मणिजेतसे ॥ ४८ ॥

जैं जईं जेधवां जेव्हां जों ज्या काळीं ह्मणावया ।
तों पावेतों तवंवरी तोंवरी तंवरी तवं ॥ ४९ ॥

जों पावेतों जवंवरी जोंवरीं जंवरी जवं ।
वेळेवारीं सीघ्रकाळीं वेळेस समईं ह्मणी ॥ ५० ॥

वेळोवेळां ह्मणितल्यां प्रतिवेळेंत जाणिजे ।
वारंवार ह्मणितल्या प्रतिवारीं पुनःपुन्हां ॥ ५१ ॥

लौकरी तें लवकरी वेगीं वेगीहि लौकुनी ।
लवलाहें सीघ्रकाळीं त्रितीया तेंचि रूढ हें ॥ ५२ ॥

लकोरही झडकरी झणींही वहिलें झनी ।
झनें ह्मणितल्या शब्दीं येखाद्या समयांतरीं ॥ ५३ ॥

अवसात अकस्मात येकायेकींहि औचितां
आणीकही अवचटें अवचीत अकल्पित ॥ ५४ ॥

येकसरीं येक काळीं येकदसहि येकदां ।
येके काळीं येकदां तें येकवारहि तें सकृत् ॥ ५५ ॥

येके काळीं येकवारीं शब्दही बोलिजेतिल ।
त्रिसंध्याकाळ मिळुनी त्रिकाळ ह्मणिजेतसे ॥ ५६ ॥

अखंड सर्वदा नित्य निरंतर चिरें सदा ।
अतूटही नीचनवें नित्यनूतन जाणिजे ॥ ५७ ॥

हा काळवरि अद्यापि अझुणीं ह्मणिजेतसे ।
इतःपरी याजवरी इतुक्यावरि यावरी ॥ ५८ ॥

यानंतरें याउपरी इत्क्यावरिहि यापुढें ।
त्यानंतरें त्याजवरी त्यावरीहि तथावरी ॥ ५९ ॥

त्याउपरी त्यापरीच ह्मणिजे आणि त्यापुढें ।
त्रिधा कालक्रमें पतें या ज्या त्या उपरांतिक ॥ ६० ॥

अर्वी अगोदरी आधीं मग मावून बोलिजे ।
पहिलें पूर्वी पूर्वीं मार्घे मागांहि आदिही ॥ ६१ ॥

अद्यीनें पहिल्यांदांही पहिल्यानेंहि बोलिजे ।
चालत्या दिवसीं पूर्वीं ह्मणाया बोलिजे मर्या ॥ ६२ ॥

भविष्यदर्थीं पुढती पुढां काळांतरीं पुढें ।
झोरेंही ह्मणिजे त्यासी मोहरें ह्मणिजे तथा ॥ ६३ ॥

होईल तेंचि होणार होईक ह्मणिजे तया ।
अगाऊ ह्मणिजे कार्यकाळा प्रथम वेळ ते ॥ ६४ ॥

भलत्या संगती काळ प्रसंग ह्मणिजे तथा ।
काळीं कारण सूर्येंदुकर्में जन्मादिकें वदूं ॥ ६५ ॥

सूर्य सूर्यो दिनकरु सूर्यां आदित भानजी ।
जगमित्रहि बोलूं ये सुरुही कमळाकरु ॥ ६६ ॥

सूर्याची अंतुरी छाया राणादेवी ह्मणोनि घे ।
सूर्यरस्मी किरण ते रुक ते बोलिजेतिल ॥ ६७ ॥

किरणाचा संघ जो तो ऊन तेंच नपूंसकीं ।
ऊनें भासे मृगजळ रोहिणीजळ नाम त्या ॥ ६८ ॥

अभाळें अप्रकाशें जें तावितें ऊन तें सुकें ।
कडाखा ऊन कडक नामें मंदोष्ण सोमट ॥ ६९ ॥

उजितें तेज हें दोन्हीं उष्ण कांतीस बोलिजे ।
प्रभा जे ते तो प्रकाश उजियेड उजेड तों ॥ ७० ॥

ऐश्वर्य मुखिच्या कांती ते ताले ह्मणिजेतिल ।
नरवृक्षादिकीं तेजें ताजकी टौटवी तथा ॥ ७१ ॥

शस्त्रादिकांचें जें तेज तें पाणीं आप आबही ।
मुखावरील धैर्याचें तेज पाणी ह्मणोनि घे ॥ ७२ ॥

रत्नादिकर ते कील किला त्या कांतिही तिया ।
तेजोमयाप्रती नामें जिगणा ह्मणिजेतसे ॥ ७३ ॥

शोभतें तेज सामान्य ढाळ तो वोप तें तथा ।
प्रकाश फांकणीं नामें समूहीं जाणिजेत हें ॥ ७४ ॥

झगझग झगमग जिगजिग तगतग ।
झळझळ लखलखु ववघव झळकी ॥ ७५ ॥

झळकू झमकू दोनी पुलिंगीं कांति फांकणी ।
तेजोमयें लखाकीत झकाकीतहि या इतें ॥ ७६ ॥

झगझगादिक जाणावी हलतें तळपे तसें ।
अग्निकांती धगधगीत स्वर्णरत्नादि तांबटी ॥ ७७ ॥

घोंटीव दाटशा रूपीं कांति जे नळनळीत ते ।
काळ्या वर्णीं कुळकुळीत चंम्चमी स्निग्ध ते मधें ॥ ७८ ॥

तेजाधिक्य लखलखाट तेजबंबाळ बोलिजे ।
तेजाचा कलिकाकार ज्योती ते ह्मणवीतसे ॥ ७९ ॥

दिवा तो दीपकूही तो दीपू तो ह्मणिजेतसे ।
जें दिवे लावणें तेंची दीवलावण ह्मणोनि घे ॥ ८० ॥

नामें खजर खंजीर समई दीपखांब तो ।
ठाणादिवी ठाणवई काष्टाचे दीप खांब ते ॥ ८१ ॥

दीवी मसाला दिवटी पोत जो तोच धुंधुरू ।
वाती बत्ती ह्मणविते तेचि ठोंसर कांकडा ॥८२॥

दीपप्रभा ढग्ढगीत धडधडीत शिखप्रभा ।
प्रकाशलें उजळलें उदेलें तें उद्दैजलें ॥८३॥

खद्योत तेंच जिगणा पुल्लिंगीं तोच काजवा ।
मळालें मैळलें आणी मळलें तेणकाटलें ॥ ८४ ॥

काळें जें जाइलें तें ह्मणिज काळवंडलें ।
मसैरें तेंच अंधारें अंधारु अंधकार तो ॥ ८५ ॥

काळोखेंही काळवखें तथा गडद बोलिजे ।
धुमारलें धुर्कटलें वांधुरीही धुर तथा ॥ ८६ ॥

धुपतीये आगटीचा धुर तो धुरिही धुई ।
मंद प्रभा मिणीमिणी बोलिजे मकमकी तथा ॥ ८७ ॥

कांहीसें दिसते ठाईं शब्द झुंजुक धुंडुक ।
तारांगणें ह्मणीतल्यां नक्षत्रांचा समूह तो ॥ ८८ ॥

स्त्रीलिंगी तार ताराही चांदणी चांदिणी तथा ।
असे नपुंसका लिंगीं नक्षत्र ह्मणवोनियां ॥ ८९ ॥

चांदाचो अंतुरी जे ते चांदिणी तेच रोहिणी ।
चांदणें चांदिणें चांन्नें चंद्रिका सम संस्कृतीं ॥ ९० ॥

चंद्रवर्ता वर्तुळत्वें परिवेशु तैसें खळें ।
उदयास्ता प्रतीनामें उदो अस्तु ह्मणोनियां ॥ ९१ ॥

चंद्र चंदरही चांद मयंकू चंद चंद्रमा ।
कळानिधी ह्मणउनी बोलिजे सम संस्कृतीं ॥ ९२ ॥

येथें कळा ह्मणितल्या अमृताचेच भाग ते ।
चडल्याही उतरल्या कळा सोळा शशींत त्या ॥ ९३ ॥

हवाव भांभ शोभाही नव्हाळी आणिखी कळा ।
स्त्रीत्वीं इत्यादि पुल्लिंगीं येवा ह्मणुनि जाणिजे ॥ ९४ ॥

हिवांर दवं दैंवार हिंवंली हिमपुंज तो ।
जीव तो जीवडा प्राण आत्माही बोलिजेतसे ॥ ९५ ॥

वपू स्त्रीत्वीं कुडी स्त्रीत्वीं शरीर तनही तियें ।
अस्त्रीत्वीं देह ते काया अंग ते रूप आयही ॥ ९६ ॥

स्त्रीत्वीं मूरुति मूर्त्ती ही आकारु तेच सूरत ।
चित्र तें लेप तो आणि स्त्रीत्वीं तद्रूप सूरत ॥ ९७ ॥

स्त्रीलिंगी सावली छाया साइ आणिक साउली ।
उपजू जन्म जनम निफजू निपजू तथा ॥ ९८ ॥

उभउ इति पुल्लिंगीं असे जनन तें असें ।
पुल्लिंगी गर्भ गरभ रूपिंड ह्मणिजे तथा ॥ ९९ ॥

क्लेशें डोळ्यांसि ये पाणी ते असू ह्मणिजेतसे ।
आनंदें बाष्प दाटे तो प्रेम प्रेमा ह्मणोनि घे ॥ १०० ॥

स्त्रीचर्या रीतिही चाली वर्तणूक चलंतिही ।
वाहिनी धोरणी दोनी थोरा रीती दशाचिया ॥ १०१ ॥

वांचणें तें जिणें जीणें जीविका तेंचि जीवन ।
जीवनार्थीं जितवण स्त्रीलिंगी बोलिजेतसे ॥ १०२ ॥

जिदंगाणी नांदणूक स्त्रीत्वीं ते ह्मणिजेतसे ।
स्वभावो तो प्रकृति ते कुकार्यासक्ति खोडि ते ॥ १०३ ॥

प्राणी तो देहधारी तो जंतु सामान्य तो कळो ।
जाती याती म्हणाव्या त्या औख आयुष्य औक्ष तें ॥ १०४ ॥

सत्कृती पुण्य तें होय दुष्कृती पाप जाणिजे ।
दशा ते भाग्य तें होग दैव तें ह्मणिजेतसे ॥ १०५ ॥

कपाळ तेंच प्रालब्ध अदृष्ट ह्मणिजेल तें ।
बरें वाईटही कर्म धर्म तो पुण्यवाचक ॥ १०६ ॥

काम तें काज तें आणि कार्यही तेंच जाणिजे ।
धंदा तो आणि धांदा तो फेरीचें कार्य धावती ॥ १०७ ॥

स्त्रीलिंगीं ते खटपट श्रमसाध्य असे म्हणें
मूळ तेंचि कारण तें हेतु तो ह्मणिजेतसे ॥ १०८ ॥

दोष तो व्याज तें आणि मीस तेंच निमित्त तें ।
कल्याण तें मंगळ तें बरें तें क्षेमही शुभ ॥ १०९ ॥

लाणी ते आणि लाणें तें लाहो तो लाभ तो कळो ।
जोडी ते प्राप्ति ते जाणा सरफा फाइदा नफा ॥ ११० ॥

येव तो ते मिळकती संकेतें ह्मणती क्षरा ।
नष्टी ते तुटी ते तोटा नाडे हाणीहि घात तो ॥ १११ ॥

मातीसीं मीनलें तैसें मातेरें ह्मणवीतसे ।
नास तो भाश तो आणि खेद तोच हराशु तो ॥ ११२ ॥

खप तो खर्च तो आणी वेंच तो सरणें तथा ।
पैरी तोपाखिते धाडी यौगिकी बोलिजेतसे ॥ ११३ ॥

देवाज्ञा ते मरण तें अंत तो अवसान तें ।
ह्मणीतलिया निमण जीवनाशचि जाणिजे ॥ ११४ ॥

निदान तेंचि निर्वाण प्रांत तो तोचि सेवटु ।
अकांत वळसा आणी अनर्थेहि अवातही ॥ ११५ ॥

अटकाव तो आडकाठी तडा तो तट तो तथा ।
अडी ते अडथाळा तो खोळंबा अडसो तथा ॥ ११६ ॥

बंद तो बंध तो आणि तें बंधन ह्मणूनि घे ।
स्त्रीलिंगीं बंधना फार रोधीं अवळ बंधना ॥ ११७ ॥

धरुनी बांधि ते ठाईं धरबांधी ह्मणोनि घे ।
विटंबणें ते रांडोळी धरोनी बंधनादिकीं ॥ ११८ ॥

विनाशकाळ जो तोचि स्त्रीत्वीं जाती ह्मणोनि घे ।
ते मोकळीक सुटिका जाणिजे सुटका द्वयीं ॥ ११९ ॥

थोरी थोरींवही स्त्रीत्वीं तें थोरपण थोर तीं ।
स्त्रीलिंगीं होय सानीव सानेपण नपूंसकीं ॥ १२० ॥

उणीव ते उणें तेंचि गरिबी दुबळेपण ।
स्त्रीत्वीं येळील हलकेपण होय नपूंसकीं ॥ १२१ ॥

राजत्व तेच राणीव साहेबी तेच जाणिजे ।
स्त्रीत्वीं गरुवती थोरी गुर्वैतीहि गुरुत्व तें ॥ १२२ ॥

॥ इति कालवर्ग समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

* * *

## वर्ग नववा

॥ श्रीगणेशाय नमः ॥
भाषेंत श्लेष यत्किंचित् सुचलें कथिजेतसे ।
आदिक्षांतादि ते शब्द क्रमें येथें प्रयोजिले ॥ १ ॥

सम संस्कृतही काहीं रूढ ते शब्द योजिले ।
कांहीं संस्कृत पर्यायें प्राकृतार्थ अटोपिला ॥ २ ॥

ग्रंथ वाढेल यासाठीं लिंगें पुर्ती न बोललीं ।
मागील पदपर्याय वर्गावरुनि सूचती ॥ ३ ॥

आकारांतें पूर्व पद दुसरें गौरवें तऱ्हीं ।
होय तें विपरीतार्थ काकुनें होयही नव्हे ॥ ४ ॥

संगतीयुक्त लागे तो अर्थ आदरिजे बुधीं ।
भाषाप्रबंधकर्त्यांसी रसिकां विनवीतसें ॥ ५ ॥

आतां दयेसीं परिसा नानार्थ पदपद्धती ।
अपाड साम्यारहित अशक्य ह्मणिजेतसें ॥ ६ ॥

अव्हेरु ह्मणिजेताहे उपेक्षा आणि त्यागणें ।
अनाकळित अज्ञात अनायासें अचिंतित ॥ ७ ॥

अहाच अल्प उतळ तथा निर्बळ मोकळें ।
अढळू निश्चळू दृष्ट अचळू पर्वताढळ ॥ ८ ॥

अंगसन्नाह कायाही अर्थ आसक्ति भावही ।
अर्थीं विषयही होती धनही अर्थ बोलिजे ॥ ९ ॥

अनारिसें सखें आणि वेगळेंही अपूर्वही ।
अरौता ह्मणिजे सत्ता अलीकडिल तो तथा ॥ १० ॥

अपैतें आइतें आणि अपेंसी ह्मणिजेतसे ।
आपेंसीं उदकेंसींही आपल्यपणही तथा ॥ ११ ॥

अपैसें तें अविस्तारें आपेंसीं सहजीं तथा ।
ह्मणितल्या अडसूठी अकस्मात विनाश्रमें ॥ १२ ॥

आणीकही अडमुठी बंदोबस्तीविना स्थिती ।
अगण्या गणवेना तें तुच्छही ह्मणिजेतसे ॥ १३ ॥

ह्मणितल्यां अणगटें मेखा अंकुरही मुळें ।
अभंग नाम पर्याय पद आणि अभेद्यही ॥ १४ ॥

अरती रति नोव्हे ते अलीकडिल योषिता ।
अरती आरती ऐशा दोंत नीरांजनार्थेची ॥ १५ ॥

अक्षरें वर्ण वदनीं उष्णें होती लघु क्षतें ।
अंगारा ह्मणिजे रक्षा अंगें जीचा जुलालहि ॥ १६ ॥

आकार पूज्य अंगारा चित्राचा स्थूळ भावही ।
अरणी ह्मणिजे सेना अग्निमंथन काष्ठही ॥ १७ ॥

नाशरहित रक्षाया कारणीक त्रिलिंग तें ।
अचुंबित अपूर्वार्थ अभोगितहि निश्चित ॥ १८ ॥

अपंचीकृत संपूर्ण न झेपावे उदंडही ।
अधीक ह्मणिजे श्रेष्ठ उंच आणि उदंडही ॥ १९ ॥

आळुकी व्यसनासक्ती अधाडा तळ मध्यही ।
अलोलिक अनासक्त लोकातीत गुणाढ्यही ॥ २० ॥

ह्मणीतलीयां आपणपणारहितही स्वयें ।
अलें आर्द्रक जाणावें येतें जालें असें कळो ॥ २१ ॥

उदेलें प्राप्त जाहलें अलें आलें ह्मणोनि घे ।
अंबा ह्मणितल्यां आम्रफल आणिक पार्वती ॥ २२ ॥

अनाड तें खोडकर धातु नष्टहि दृश्यही ।
अमोलय बहु मोलाचें मोल लाहेचना तसें ॥ २३ ॥

अलोट लोटवेना तें न चले मंद यामुळें ।
न तर्केसें अकळ तें कांतिहीनहि मूढही ॥ २४ ॥

ह्मणीतल्यां अडकिता लोहा पोफळखंडिता ।
आणीकही अडकिता रोधिता ह्मणवेल तो ॥ २५ ॥

स्वयें गुंते दुज्या रोधी स्त्रीत्वीं अडकणी तसी ।
ह्मणीतल्या अडकणी तंडुलार्थेहि जाणिजे ॥ २६ ॥

अभाळ ह्मणिजे मेघ आकाशहि अभाळ तें ।
म्हणीतल्यां असवल ऋक्षही राहवेलही ॥ २७ ॥

अंगोठा ठेवि अंगाची अंगोठा अंगठा तथा ।
असोसी ह्मणिजे सोस पदभेदें असो असी ॥ २८ ॥

अगस्ती घट ज्या नाम अगस्ती हेत गा तथा ।
ह्मणीतल्या अचपळू चपळू निश्चळू तथा ॥ २९ ॥

अनेक शब्दीं बहुत येक नोव्हे आणीकही ।
अरिसा शत्रुसा आणी अरिसा होय दर्पण ॥ ३० ॥

अरि शब्दार्थ तो ऐसा कापी आणि रुपे खुपे ।
ह्मणोनि अरि तो शत्रू नेत्र दुमींस ते अरी ॥ ३१ ॥

अरा त्याचा कफालीही कुक्कुटा बांधित्या सुऱ्या ।
पक्षि पंजातळीं धारा त्याही ह्मणवती अरा ॥ ३२ ॥

आपुलें अपुलें आणी तुमचेंही ह्मणावया ।
अडें तें अडवें आणी वासा जो वरिला वरा ॥ ३२ ॥

अळें ह्मणितल्या स्नेहें अळें तें आलवाळही ।
अंदूच कंदळें कीट नूपुरें गजशृंखळा ॥ ३४ ॥

अंकूर ह्मणिजे मोड स्वभावो दृढ जन्मता । ( इत्यकारादि )
आड तो डोळ्या पतीं आड तो ह्मणिजे कुहा ॥ ३५ ॥

आळी ह्मणितल्यां बीदी छंदही अळिका तथा ।
आटी ह्मणितल्यां यत्नें नाशही आदि जाणिजे ॥ ३६ ॥

आणी कुंची आणखीही आणी ते आणणें करी ।
आव पूर्णत्व आकार धैर्यहि स्थळिची मिती ॥ ३७ ॥

आव शब्दें निश्चयार्थ आणीक अवकाशही ।
आथिला ह्मणिजेताहे आसता अर्थवानही ॥ ३८ ॥

आय आकार युक्तीही वशता लाभही मिती ।
तैसेंच आय शब्दार्थीं ठिकाण ह्मणिजेतसे ॥ ३९ ॥

आभारैला ह्मणितल्यां दाटला श्रम पावला ।
आहाळलीं ह्मणितल्यां भाजलीं आणि पीडलीं ॥ ४० ॥

आयणी ह्मणिजे इच्छा रीतिही तत्वनिर्णय ।
सामर्थ्य आणि प्रसरु आयणी ह्मणिजेतसे ॥ ४१ ॥

आपजे उपजे वाटे आन तें अन्य वेगळें ।
आर्ती आसक्तिही पीडा इच्छाही प्रीतिही तथा ॥ ४२ ॥

आगरार्थीं बोलिजेत पिकलें सेत खाणिही । ( इति आकारादि )
इसाळ ह्मणिजे ईर्षा कामुक ब्रह्मराक्षस ॥ ४३ ॥

इष्ट स्वजन आणीक इष्ट आवडतें तसें । ( इति इकरादि )
उन्मेष ज्ञान संतोष आणीक अवधानही ॥ ४४ ॥

ह्मणितल्यां उपनला जन्मला प्रगटावला ।
ह्मणितल्यां उधवला उसळला अंकुरावला ॥ ४५ ॥

ह्मणीतल्यां उपहत हतहीण विटाळलें ।
उवाइला बोधिला तो बोधिला भाव तोषला ॥ ४६ ॥

उवाइला शुद्ध केला पावला पसराप्रती ।
उपाइलें ग्रास जालें पसलें ख्यात उत्तम ॥ ४७ ॥

उजरी रीति ऋजुता स्वच्छता सरिसेपण ।
उमाणणें मेजणेंही पडोसा मानणें तथा ॥ ४८ ॥

मापाचें शोधणें आणि प्रचीती पाहणें तथा ।
उभडू भडका लाट झराही उभडाच तो ॥ ४९ ॥

उबावो सुखआधिक्य उशिणें सूडही ऋण ।
उणें ह्मणितल्यां थोडें नीचही ह्मणिजे उणें ॥ ५० ॥

उबडी पालथी आणी उवडी ह्मणिजे कळी ।
उपखा उपसा व्यर्थ उखी ऊहा अनित्यता ॥ ५१ ॥

ह्मणितल्या उधवली उडाली वृद्धि पावली ।
उठीला तो उभा ठेला निघाला चवला तथा ॥ ५२ ॥

आवेशला खडबडी आलाही उठिला तथा ।
उदितें वाढतें सिध्द उदितें तें प्रकाशतें ॥ ५३ ॥

उकळी कढ उल्लाळ बोलणें जें अनावर ।
उकळी ह्मणिजे अर्थ घेतां वळुनियां तसा ॥ ५४ ॥

ह्मणीतल्यां उपपत्ती युक्ती घगडही तथा ।
उगेंच ह्मणिजे व्यर्थ उगेंच सहजार्थही ॥ ५५ ॥

उगाणा ह्मणिजे झाडा सांगणेंही समर्पणें ।
उजितें सगडी तेज उकाडाही प्रकाशही ॥ ५६ ॥

आगंतुक येकसरें दोनी तें उखितें ह्मणी ।
ह्मणीतलियां उडतें टिकोरपण दीसतें ॥ ५७ ॥

न टिके तेविंही भासे पांखिरूं बळवंतही ।
ऊन तें तापलें तैसें सूर्य रस्मीसमूहही ॥ ५८ ॥

ऊर वक्षस्थळा नांव स्त्रीस्तना ऊर बोलिजे ।
ह्मणीतल्या उगळिलें वमिलें आणि वेंचिलें ॥ ५९ ॥

उकाडा रंधना नांव उबाऱ्यासहि बोलिजे ।
उटी बाकी गंधलेपू उंडी ग्रास बळी तथा ॥ ६० ॥ (इति उऊकारादि)

एक हेळा एकवार तैसेंच अविचारित ।
येकदेशी येकला तो येके ठाईंच राहता ॥ ६१ ॥ ( इति एकारादि )

ऐसें ह्मणितल्या शब्दीं यापरीं जननी परी ।
ऐकणें तें परिसणें ऐकणें मानणें तथा ॥ ६२ ॥ ( इति ऐकारादि )

ओघ प्रवाह तो ओघ उपाधीही परंपरा ।
ओथंबा पाठिराखाही साक्षिही ह्मणवोनि पे ॥६३॥ (इति ओकारादि)

औत्तराख्यें उत्तरेचा अउत्तर निरोत्तर । ( इति औकारादि )
कळा विद्या आणि कांति तिडका अंश भागही ॥ ६४ ॥

ह्मणीतल्यां कडसिलें कढवीलेंहि तर्किलें ।
मथिलें कसिलें आणी यथावतचि बोलिलें ॥ ६५ ॥

विचारिलें सावधान केलें इत्यादि जाणिजे ।
कुरुठा घर गाठ्याळ खजाना शाहणा तथा ॥ ६६ ॥

विभाग समुदायाचा कित्ता आणिक येकदां ।
कांटाळा बद्ध रोमांच कांटाळाहि तराजही ॥ ६७ ॥

कोडें संकटहि प्रीती कौतुकेंहि मनोरथें ।
किडाळ खोटें आणीक किडाळ फटकाळहि ॥ ६८ ॥

किडाळ कल्मषाचें तें किडाळ किडखादलें ।
कुडें ढोणें कपटही खोटेंहि लटिकें कुडें ॥ ६९ ॥

कूड आंधार आणीक अडुखा बांधले फडे ।
कैंचें ह्मणितल्यां नाहीं कर्धीचें ह्मणवे तसे ॥ ७० ॥

काढणें तें उपटणें धाढणें लावणें तथा ।
घेणेंहि काढणें होय काढतें तें चुकावणें ॥ ७१ ॥

कुळवाडी संतती ते रयतावा ह्मणोनि घे ।
कपर्दी कवडीचा तो कपर्दी सिव बोलिजे ॥ ७२ ॥

कुवांसा आश्रयो मित्र कुटा निंदापवादही ।
कुटी ह्मणितल्या मारी गुहा पर्णकुटी कुटी ॥ ७३ ॥

मोरकुंचा आणि ध्वजा दोनी कुंचाच जाणिजे।
कामठा ते टांकसाळ आणि कामाट कामही ॥ ७४ ॥

कंस मामा कृष्णजीचा कंसाख्यें दर्भकाष्टही ।
काम स्मरु काज इछा कलाकलहि सांडिही ॥ ७५ ॥

कांतले जुंपले आणी वळले कृश जाहले ।
कांदे कंद पलांडूही दे कां ह्मणुनि मागणं ॥ ७६ ॥

अनेक मत कैवार कैपक्ष ह्मणिजेत ते ।
कस वर्धणही दार्ढ्य आणी अवळबंधन ॥ ७७ ॥

सार सत्वहि जाणावें परीक्षा ह्मणिजे कस ।
कमान धनु आणीक उंचीं मंडप मेळणी ॥ ७८ ॥

कोष्टी किडाही जुलई कपाळा दृष्ट भाळही ।
किलूपाचा हात किली वर्मही ह्मणिजे किली ॥ ७९ ॥

काल कालासी ह्मणिजे तथा कदलिगर्भही ।
काय आधिक्यही स्वल्प काकुशांकितही तथा ॥ ८० ॥

कानडें भेद भाषेंत कानें भूसक्त कानडें ।
अतर्क्यही कानडें तें रागभेदांत कानडा ॥ ८१ ॥

काळी ते काळिकादेवी शामला युवती तथा ।
ककारादिक वर्णाची पंक्ति काळी ह्मणोनि वे ॥ ८२ ॥

कुडी वोंगळही देह कांसें कांस्यहि कां असे ।
कास आश्रयही माज कास गोस्तनमंडळ ॥ ८३ ॥

आणिखी कास ह्मणतां काच शब्दार्थ जाणिजे ।
कसाला कष्ट आणीक कसा आला असें सुचे ॥ ८४ ॥

कथिली कथलाची ते आणि सांगितली तसी ।
कण दाणा आणि कणी अर्थेही ह्मणिजे कण ॥ ८५ ॥

कौल शब्दें कउलही आणीक कबुलातिही ।
कडवें तें कडू आणी पद्यीं पल्लवि संपुट ॥ ८६ ॥

कडे जवळि माजींही पर्वतप्रांत ते कडे ।
कडे प्रदेशीं ह्मणिजे कांठसीं ह्मणिजे कडे ॥ ८७ ॥

कळी कल्हो कलियुग काचें फुलतसे कळी ।
नारेळींचा करंडाही बारीक ह्मणिजे कळी ॥ ८८ ॥

कांटा लोकांसि जो त्रासी कांटा नाम कंटक ।
रोमांच तीक्ष्ण सूक्ष्माग्र कांटा ह्मणुनि जाणिजे ॥ ८९ ॥

सांद ते काम मोडी ते उक्ति कांटा ह्मणूनि घे ।
कडका पद्य घाटीही गर्जितो छव कांठही ॥ ९० ॥

केळी कर्दळिचें नांव केळी घागरि मातिची ।
कर्दली कदली आणी कर्दली काटली तसी ॥ ९१ ॥

कीं प्रेमीं निश्चईं खेदीं काकूर्थींही पुसींत कीं ।
पूर्व शब्दा अनुसरें सागें अव्यय रूप कीं ॥ ९२ ॥

आक्षेपार्थीं निषेधार्थीं काकूर्थीं आदरीं तथा ।
तुच्छार्थीं कारणार्थीं ये पूर्व शब्दां करोनि कां ॥ ९३ ॥ ( इति कादि )

खळें धान्य मळायाचें स्थळही खळगा तथा ।
खंती चरफडी त्रास उत्कंटेसहि बोलिजे ॥ ९४ ॥

खळ दुष्ट खळी नाम खेंव तत्काळ भेटिही ।
खणार्थीं पांच सुगडीं माडीवरिल अंखणें ॥ ९५ ॥

कंचुकीची वस्त्रमिति तेही खणचि बोलिजे ।
खता नाशहि तांबेरें खेम क्षेमहि भेटिही ॥ ९६ ॥

खपलें खर्चलें आणी तुकड्यासहि नाम तें ।
खट कर्म कुकृत्यार्थे षट्कर्मार्थेहि जाणिजे ॥ ९७ ॥

समुद्राचा प्राट खारी खारी रोगिष्ट नष्टही ।
गळाळ उकळी ओघ खळाचा आल जाणिजे ॥ ९८ ॥

ह्मणीतलीयां खडक निर्वाण त्रखडी तथा ।
हिशोवीं रद्द तें पत्रें खरडे मोतियें उणीं ॥ ९९ ॥

खंडितू तो खरा आणी निष्ठुरू खंड पावला ।
खरे उष्णाचिया सेगा साचे ह्मणवती खरे ॥ १०० ॥

चंदनाचें खंड खोड जीनामधिल आसन ।
वृक्षादि बोड तें खोडं चर्मारहित सांदळ ॥ १०१ ॥

ख्याती कीर्ती लावण्यानें सिक्षाही ख्याति बोलिजे ।
खांड कांडें साखरही खंडही धार भंगही ॥ १०२ ॥ (इति खादि)

गमिजे पाविजे आणी भाविजे कमिजे तथा ।
गजरु गर्जणें आणी गजरू शोभनध्वनी ॥ १०३ ॥

गिवसे सांपडे वेढे ध्याना ये गिवसे तसें ।
गांवढे ह्मणतां येथें खेडाळहि गव्हारही ॥ १०४ ॥

गहींस ह्मणतां येथें नेणताही निवांतही ।
गाडोरा खळगा पाया गहनू थोर खोलही ॥ १०५ ॥

ग्रह भूतादि सूर्यादि गुणी गवइ गारुडी ।
मंत्रवादीहि गुणवान् गुणिये ह्मणिजेत ते ॥ १०६ ॥

गवादि छत्र आणीक गाइआदीहि जाणिजे ।
गर्भीथिली गाभिण ते किडयासीं युक्त गाभिण ॥ १०७ ॥

गुढी दूरील वृत्तांत पाडव्याची ध्वजा गुढी ।
डोंवारियांचा आधार दुर्गही गड बोलिजे ॥ १०८ ॥

गाळिलें त्यागिलें आणी गाळिलें शोधिलें तसें ।
गुळवेलु वेलभेद गुळही आणि वेलही ॥ १०९ ॥

गज तो गर्जतो आणि हत्ती तो ह्मणिजेतसे ।
गज हत्ती आणि काठी चोवीस तसुचे मिति ॥ ११० ॥

गंडाचें स्थळ तें गंडस्थळ आणि निकुंभही ।
गणवर्ग गणाधीश बालरक्षा गणाभिधा ॥ १११ ॥

गोळा संकोच गुंडाही गोरा गोवळ गौरही ।
मनासी रुचतें गोड तें ह्मणिजेतसें ॥ ११२ ॥

गोठ शब्दें हवेलीही बोटपट्टी सटीवही ।
गुण सद्गुण आरोग्य गुण भागहि जाणिजे ॥ ११३ ॥

गार शब्दें गारगोटे पाणगोटेहि सीतळ ।
गौरी मृगार्थ गाणें तें गोरी उजळ बाइको ॥ ११४ ॥

गाडा गाढा चाक नथ गडी दुर्गेहि मित्रही ।
गंगाळ पात्रपर्याय गंगेचा आळही तथा ॥ ११५ ॥

ह्मणीतलीयां गमती तमासे आणि भासती ।
गुमान गण्य अधिक्य गौळी गोवळ पालिही ॥ ११६ ॥

गाठी ग्रंथी गरसही ऐक्यभावहि संगती ।
गळा कंठासि ह्मणिजे कंठमाधुर्यही तथा ॥ ११७ ॥ (इति गादि)

घारलें व्यापलें आणी घारलें तेंच खारलें ।
घांट घांटी आणिकही युक्तीनी घट्ट निर्णिला ॥ ११८ ॥

घोर शब्दें पित्तळेची वीण्याची तांथि जाणिजे ।
अंत्य श्वासहि तो घोर बहुपीडक संकट ॥ ११९ ॥

घसा गळ्यांतील भाग कंठमाधुर्यही घसा ।
घडी थाली लोटकेंही घटिका ह्मणिजे घडी ॥ १२० ॥

चापचोपें कापडाची बसणी ह्मणिजे घडी ।
घडोनि चालतें नीट त्या काजा ह्मणिजे घडी ॥ १२१ ॥

ह्मणिजे तें घडी ऐसें काजकर्त्या त्रिकाळिच्या ।
घावो क्षती कांडितांही भेरी त्राहटितां ह्मणी ॥ १२२ ॥

सडाया उखळामाजी भाजाया रांधण्यामधें ।
घालीतीये धान्यमिति नामें घाणे ह्मणोनियां ॥ १२३ ॥

तिळइक्ष्वादिसारांश काढायालागि निर्मिली ।
यंत्रे जें त्यांसही आलीं नामें घाणे ह्मणोनियां ॥ १२४ ॥

आकारलें तें घडलें घडलें प्राप्त जाहलें ।
ह्मणीतल्यां घसघस घांसणें कलहादिही ॥ १२५ ॥

घोटी सुपारी ह्मणिजे घोटी सोसी गिळी तथा ।
घोळते लोळते आणी रांपतेही विलासते ॥ १२६ ॥

घोळते डालि ती शाख घोळते झोळते तथा ।
घाई निष्ठुर झगडा घाई ते वादनक्रिया ॥ १२७ ॥

सोंग तापत्रयें घाई घाई घायाळ जाणिजे ।
घांटी ह्मणितल्यां घांट घनेळा घरटी तथा ॥ १२८ ॥

घोसूढ दांडगा आणी देशभेदें अताहही ।
घेतलें जिंतलें आणी सोंगिलें अंगिकारिलें ॥ १२९ ॥ ( इति घादि )

चट चाट क्रिये नाम चट व्यसन जाणिजे ।
चट्ट शब्दांतरीं भेद चट्ट संपूर्ण खर्चिलें ॥ १३० ॥

ह्मणीतलीयां चवकी चौपाई चौक आसन ।
शूरजागृति सेवाही अग्रदंत निरोधही ।। १३१ ॥

चांदणी ह्मणिजे तारा चंद्रिकायुक्त यामिनी ।
चांदणी चंद्रपत्नीही असमानगिरी तथा ॥ १३२ ॥

चवला च्युत जाला तो चेयिला ह्मणिजेतसे ॥
चटकामाजिं पर्याय टोणें श्राधहि शब्दही ॥ १३३ ॥

ह्मणीतलीयां चिमणी सानी चिमणि पक्षिणी ॥
चंद तो शाहणा चंद्र चुळकी फोक सुंदर ॥ १३४ ॥

चालतें ते विचरतें चढे आरंभिलें सिगे ॥
नित्यही घडतें ऐसें चालतें विद्यमानही ॥ १३५ ॥

चौबाऱ्या आणि बाजारा असे चोहट शब्द तो ॥
पदार्थ चाउती घेणें रुची तो चवणा कळे ॥ १३६ ॥

दों दाढे आंतिला भाग चवणा ह्मणिजेतसे ॥
चोजवे समजे आणी आश्चर्य गमतें तसें ॥ १३७ ॥

चवरें सेवट्ट झुंडी माथा चामर आंगण। ( इति चादि )
छंदू ह्मणितल्यां वेद हटही ध्यासही तथा ॥ १३८ ॥

छत्र आधार वडिल अन्नदानस्थळादिही ॥
छेपा मुद्रा नेणवोनी बळें बुडवणें परा ॥ १३९ ॥ ( इति छादि )

जालें उत्पन्न सरलें जडभारीहि संकट ।
जांघ शब्दें चांग जागा जंघाही ह्मणिजेतसे ॥ १४० ॥

जातो निसरतो चाले रततो ह्मणवे तिसीं ।
जाती माहाराष्ट्र मुख्या चालणारी विनाशही ॥ १४१ ॥

पुल्लिंगीं चालते जाती जाईचें पुष्पही तथा ।
जुग शब्दें युग्म आणी युगही ह्मणिजेतसे ॥ १४२ ॥

जोख शब्दें वजनही स्वइच्छेचा विलासही ।
जाब प्रत्युत्तरीं आणी प्रतिपत्रींहि जाणिजे ॥ १४३ ॥

जप तत्परता आणी मंत्रावर्तनही जप ।
जीब ते जिभली आणी नगरद्वार सन्निधी ॥ १४४ ॥

जोडी शब्दें साम्यताही युग्म संपाद्यही तथा ।
जोडा युग्मा प्रतीनाम जोडा साम्यहि दंपती ॥ १४५ ॥

जिणें तें वांचणें आणी ह्मणिजे नांदणूकही ।
जीव्हार जीवनकळा मर्महीं ह्मणिजेतसे ॥ १४६ ॥ ( इति जादि )

झांसुरी अळसू आणी ओसण्णें आणि धाकणें ।
झणीं ह्मणितल्यां सीघ्र आणि वेळ येखादिये ॥ १४७ ॥

झाडिलें वर्षिलें आणी तैसेंचि परिहारिलें ।
त्रासिलें वारिला केर पाडिलें झिटकाविलें ॥ १४८ ॥

श्रृंगार कडक्याचे ते आणि झांगड झालरी ।
झोंक घोंसू हलवणें झुकणें तोलही तथा ॥ १४९ ॥

झरा पाझरही येच सानसा विहरा झरा ।
झोळू मिथ्या पदरही अबळें लांब पोचट ॥ १५० ॥ ( इति झादि )

टिकला तिलका नाम निभला ह्मणिजे तसा ।
टांक शब्दें होच जोख प्रतिमालेखिनीमुख ॥ १५१ ॥

टांकीची जे आणि तीतें ह्मणिजे टांक या परी ।
शक्यानुसार सांडीलें दोनी टाकी सखीच तें ॥ १५२ ॥

टाकणें पावणें आणि त्यजणें भिरकावणें ।
दों तळहात थिटी टाळी कानिंचा वायुरोधही ॥ १५३ ॥

टाळी ह्मणितल्यां वारी त्रिलिंगींही त्रिकाळिक ।
टीत्र शब्दें सिवणही सनद। लेखपद्धती ॥ १५४ ॥

टोणपा ह्मणेजे दंड टोणपा घडुही दृढ ।
टेंभा आधारही खांब टेंका आधार प्रौढिमा ॥ १५५ ॥

अठ्ठेताळीस रुक्याचे मेळ बोलिजती टके ।
टके ठसे अंकुरही पताका आणि अग्रही ॥ १५६ ॥ ( इति टादि )

ठाके स्थिरे कुंठितही ठी संख्या स्थितिही कळो ।
ठाव शब्दें भूप्रदेश मांडिलें पात्र जेवणा ॥ १५७ ॥

पदार्थ समुदावो तो च्यारी ठाव ह्मणोनि वे ।
ठाव आधारही होय भलतें स्थळही तथा ॥ १५८ ॥

ठाणें ठिकाण आणीक ठाण्याचे लोकही तथा ।
हरिणाची पुटकणीं धान्यकोतळही,,ठिक्या ॥ १५९ ॥ ( इति ठादि )

डाव पळी खेळण्याची लाभही डाव बोलिजे ।
डोंवा कृष्णाहि चांडाळ डोंव तो कागभेदही ॥ १६० ॥

डोल शब्दें इंगितार्थं सुंदराकार डोलणें ।
डगर ख्यात टेंकाडी डेरा तंबू बृहद्घट ॥ १६१ ॥ ( इति डादि )

ढाला निशानें जाणावीं ढाला खेटक पंगती ।
ढाल तें घालणें आळ ढाळ रेचन तेजही ॥ १६२ ॥

ढोर निःसार तें आणी दुभत्यावीण जे गुरूं । ( इति ढादि )
तूपकेळें सुचे पेरू तूपही आणि केळही ॥ १६३ ॥

तपकीर नसा नांव ह्मणिजे तप निश्चयें ।
तुकडे खपलें भक्ष तोंड तें बोलणें मुख ॥ १६४ ॥

ह्मणीतल्या तीर सिंधू नदीचे काठ सायक ।
नावेसी चालवायाचा वेळु तागा अधारही ॥ १६५ ॥

तुळी नामें तुळवट स्वल्प भारहि न्याहळी ।
त्यागणें टाकणें देणें तोल तुल्यहि झोकही ॥ १६६ ॥

तंत्र शब्दें खटपट आगमादिक मैथुन ।
गोण पाटी शस्त्र फळी थाळाही ताट बोलिजे ॥ १६७ ॥

ह्मणीतल्या ताव ताठा कागदी दोनि चौरिल्या ।
ह्मणीतल्यां तोंडवळें बिंबीफलहि वोष्ठहीं ।। १६८ ।।

तारा तांथीहि नक्षत्रें वालीचो गुरुवी वधू ।
ताठी ताठा आणि मूर्च्छा तरणी योषिता तथा ।। १६९ ।।

ह्मणीतल्यां तंग ऐसें खोगीर कसणी हया ।
तंगणें तें क्षीण होणें तटणें राहणें तथा ।। १७० ।।

तोफा ह्मणितल्यां भांडीं तोफा तो करभारही ।
तंटा ह्मणितल्यां कर्ज आणीक अपवादही ।। १७१ ।।

तोबरा बरवा जो तो ऊर्ध्व पौंडूहि तोबरा ।
पिशिवी दाणियांची जे बांधती घोडिया मुखीं ।। १७२ ।।

तास भेदु पांखिरांचा अडीच घटिका तथा ।
तीक्ष्ण धार हत्यारांची तिक्तही होय तीक्ष्ण ।। १७३ ।।

त्राय सत्ता रक्षणही ठावही त्राय बोलिजे ।
त्रिकूट चोर सिनळ चाहाड गिरिभेदही ।। १७४ ।।

त्रिमात्रा तीनि मात्राही प्रणवाप्रति बोलिजे । ( इति तादि )
थाट स्थिती दाट संघ थाट उछव मंडित ।। १७५ ।।

ह्मणीतल्यां थोकभारी तटही थोक बोलिजे ।
थांव प्रांतु उतळही बळही आणि आश्रय ।। १७६ ।।

थातंबणें थांबणें तें तैसेंच न निवारणें ।
थर चोखटही पंग्ती सेवटासहि बोलिजे ।। १७७ ।।

थान स्तनातें ह्मणिजे कुतनी मेजिती मिती । ( इति थादि )
दामोदर श्रीपती तो माडीचें घर तें तथा ।। १७८ ।।

दूर शब्दें देशलांबी सेवाहीनहि त्यागही ।
दूधभोंपळियामाजी दूधही आणि भोंपळा ।। १७९ ।।

दाट शब्दें टोंचणेंही सांद्र आणि दबावणें ।
दुपार शब्दें माध्यान्ह दोनी प्रहरही तथा ।। १८० ।।

देव दैवत देणेंही दिठी डोळाहि दृष्टिही ।
दृष्टी डोळा नेत्रबाधा दुई द्विगुण वर्कसी ।। १८१ ।।

दुबळा रिक्त दुगुणी बळीही बळहीणही ।
दुकान शब्दें बाजार ह्मणिजे दोनि कान्हीं ॥ १८२ ॥

दिंडीपताका गाणेंही दुःख क्लेशहि रोगही ।
दोषजन्नी पाप सीस दाम पैकाहि उंसही ॥ १८३ ॥

दशा अग्रफळीयुक्ता आणि पालव तंतुही ।
दुष्करत्वीं दुस्तरत्वीं दुवाडपण बोलिजे ॥ १८४ ॥

दुवारा दोनि वारा ते दुवारा दुपटार्थीही ।
दशदंड दोर्दंड सेनाही दंड तो दोणपा तथा ॥ १८५ ॥

अन्यायें द्रव्य ठकणें दंड तालीम बोलिजे ।
सुरंगा आणि विवरा दोंं तें दादर बोलिजे ॥ १८६ ॥

दुस प्रमेय आणीक वस्त्रपर्यायही असे ।
दांड धांव तथा दांडू दाटुगी धीट दांडगी ॥ १८७ ॥

दळवाडें ह्मणितल्यां सामान समुदायही । ( इति दादि )
धीर धैर्यें धैर्यवंत धड अछिद्र धंडही ॥ १८८ ॥

धड शब्दें नीट आणी ह्मणिजे दढही धड ।
ध्वनि संक्षेप संदेह सूचना नाद तर्कही ॥ १८९ ॥

धणी इछाहि तृप्तीही यजमानहि जाणिजे ।
धरिलें तें रोधिलेंही घेतलें अंगिकारिलें ॥ १९० ॥

धरिलें ह्मणिजेताहे राहिलें मानिलें मनीं ।
धाडिलें तें पाठविलें नाशिलें गवांविलें ॥ १९१ ॥

धाय दाई आणि इछा धडाधा शेरवट्टही ।
धेंडीं थोर ह्मणूं येत वोहरां नरवाहनें ॥ १९२ ॥

धियेचें अंड तें धेंडें ह्मणिजे बुध्धिचें घर ।
घडवीती अघटिता तें धेंडी ह्मणिजेतिल ॥ १९३ ॥

धुंधुरू पोत जिगणा धूर धूम्रहि थोरही ।
धसाळ तो अरसिक ह्मणिजेल उदारही ॥ १९४ ॥

धमकार्थी धगी आणी पिंवळें तेज रूपही ।
धारें तें धाकटें आणी धरांवलें गवाक्षही ॥ १९५ ॥

धोंडा तो शून्य महिना धोंडा नाश प्रयोजनीं ।
धोंडा प्रसिद्ध दगड दृढ अद्रवही शठ ॥ १९६ ॥

धाटी पदांचे स्वरूपी पल्लवी स्थिरपी तथा ॥
ह्मणीतल्यां ध्रुवपद पल्लवीं स्थिरसें पद ॥ १९७ ॥

धिंग तें उंच माणूस उपांगसह नृत्यही ।
अयुक्त नाचणें जें त्या धिंगा ह्मणुनि बोलिजे ॥ १९८ ॥ (इति धादि)

नाम शब्दें दगा आणी नाम मृद्भेद पांढरा।
आणीक नामें ह्मणती वैष्णवीं द्वादशादिकें ॥ १९९ ॥

निवणेंही वसें होणें निवणें तें सुखावणें ।
असूदें बैसणें घेणें घटाखालील चुंबळी ॥ २०० ॥

नाट नास्तिक्य तुळई येरही नाट बोलिजे ।
निजेला शयनासक्त रतला झोंपि घेतसा ॥ २०१ ॥

नाक तें श्रेष्ठही मान नाकोटें कण सूक्ष्मही ।
नळ पुण्यश्लोक कोण्ही आंतडीं नळ नामकें ॥ २०२ ॥

नळाख्यें जळयंत्रेंही पोखरीं नळही नळी ।
साकूनें आणिला पाट त्या नांव ह्मणिजे नळ ॥ २०३ ॥

निशान भेरिही खूण पताका आणि लक्ष्य तें ।
निंब निंबोळिचें झाड थोड सुंजापवादही ॥ २०४ ॥

नांव कीर्ती आणि नाम नव्हाळी झळकी नवी ।
नाना आणीक बहुधा नसे नास्तिक्य नामही ॥ २०५ ॥

न लगे नावडे ऐसें बडवेना न खर्चेतें ।
न स्पर्शे तेंहि न लगे न प्रवर्ते ह्मणोनि घे ॥ २०६ ॥

नाचणी ह्मणिजे राधी सुळीचें नांव नाचणी ।
नीच शब्दें खालपट उणा आणिक नित्यही ॥ २०७ ॥

नावेक ह्मणिजे सीघ्र क्षण येक अमाळसें ।
नाव नौका आणि क्षण अपूर्णत्व अधैर्यही ॥ २०८ ॥

निरुतें निश्चळ प्राप्त साच प्रत्यक्ष निश्चयें ॥
रथबोढण तो नाडा वेणीगुंफण दोरही ॥ २०९ ॥

आणी सरकबंधाचे नाडे ते चोळण्यादिकीं ।
नाडे तो हानि पावेसा नाडे तो न अडे तसा ॥ २१० ॥

निढिलें तें निवडिलें तीक्ष्ण केलेंहि बोलिजे ।
निबरु वृद्ध तो आणी निब्बरू कठिणांग तो ॥ २११ ॥

निभरू सभरू आणी भरारहित निभ्भरू ।
नागरू राजसू आणी चतुरू नगरस्थही ॥ २१२ ॥

निकें वरें आणि खरें न गवस्तति तालही ।
निर्वेडी निश्चयो आणी निवाडा अनुरूपही ॥ २१३ ॥

निडार समता पक्वदशा दग्पथही कळो ।
ह्मणीतलीयां निवळ निर्मळ सुरळीतही ॥ २१४ ॥

आणि पांभळही होय निगुती रीतियुक्तही ।
नेपाळ पीकदानी ते तस्तही ह्मणिजेतसे ॥ २१५ ॥

निरास निर्शना नांव आशारहित जाणिजे ।
निर्वाळा कीर नांगणें घडणेंही उजाळही ॥ २१६ ॥ ( इति नादि )

पद गाणें ताळबद्ध वाक्याधिष्ठानही पद ।
पाड साम्य योगताही प्यादा दासहि पाइक ॥ २१७ ॥

पातीं फालीं रक्षितींही डोळ्याच्या पांपण्या तथा ।
पाट शब्दें पिढें तख्त स्त्रीप्रतिग्रहभेदही ॥ २१८ ॥

पाट तो नइचा फाटा पाझरू पाट बोलिजे ।
न राहती न घडती दों तें पारुषती ह्मणी ॥ २१९ ॥

पाहाया योग्य पाहालें तेजोमयहि जाणिजे ।
अन्येंत पाहवे तैसें देखलें आप आपणां ॥ २२० ॥

पवाड ह्मणिजे ख्याती प्रवेश अवकाशही ।
ताकावरील निवळी तुछ दोनीहि पांभळी ॥ २२१ ॥

पाबळें पर्णकुटिका तुछ नश्वरही तथा ।
प्ररोहांकुर पारंबी पर पंख परंतुही ॥ २२२ ॥

डोळ्याआंतील पडळ परा वा पर बोलिजे ।
पांढरी धवळी स्त्रीत्वीं पांढरी गांविची मही ॥ २२३ ॥

पांग हंग तथा दैन्य पराधीनत्व बोलिजे।
ह्मणीतल्यां परिवर सोपाडी मसिलें घर ॥ २२४ ॥

ज्ञाना अनुभवातेंहि नीतीं ह्मणिजेतसे ।
मेजिलें धरिलें दोनी ह्मणिजे पडिधाइलें ॥ २२५ ॥

पेंडी आधिक्य जुडगी पिसें वेडेंहि पिंछही।
पीसें पान करी तैसें अत्यंतासक्तिही पिसें ॥ २२६ ॥

पणती परळें आणी प्रपौत्री पणती तथा।
पाठोवाटीं ह्मणितल्यां पाठीसींहि पुनः पुनः ॥ २२७ ॥

पारवा तोक पोताही सामान्य खग रंगही।
पाणी उदकही तेज खड्ग तैक्षिण्यही तथा ॥ २२८ ॥

विड्याचें पान तें पान अन्यें नामेंचि रूढ तीं।
ह्मणाल्यां पोटतिडक आस्थाही पोटशूळही ॥ २२९ ॥

पोटागी ह्मणतां आस्था पोटाआंतील आगिही।
पुढें ह्मणितल्या अर्थीं पुढतीही समोरही ॥ २३० ॥

पोटविस्तार उदर अंतर अशनार्थही।
ह्मणीतल्यां परगुणें परावीयाचिया गुणें ॥ २३१ ॥

आणीकही परगुणें ह्मणेजे पाहुणेरु तो।
ह्मणीतल्यां पट्ट तख्त चित्रलेपहि जाणिजे ॥ २३२ ॥

पीठ भद्रासना नाम पिष्टही पीठ बोलिजे।
पिकलें पक्व जाणावें फळलें प्राप्त जाहलें ॥ २३३ ॥

पेटीं कमरबंदभेद आणि संदूक सांगडी।
पोटीं पोटामाजि माजीं पण पैज परंतुही ॥ २३४ ॥

भलतें येक वस्तुत्व पण शब्दें विरूढलें।
पुरलें पुर्वव्या आलें भूमिनिक्षिप्तही तसें ॥ २३५ ॥

पंज पांचा प्रतीनाम पंचमुखहि लालही।
ह्मणीतलीयां पदर पालवो भेदही तथा ॥ २३६ ॥

अन्वयो सोयरीकेचा आणि आश्रयभावही।
प्याला तो पात्रपर्याय पिता जाला पयाप्रती ॥ २३७ ॥

पथ्य तें हित आणीक खाणीयांचा निरोधही ।
पायें पदें आणि मूळें पाशीं पाशांत सन्निधी ॥ २३८ ॥

पटा विस्तीर्णता वाट पड्डा वाटिती शिळा ।
पुसिलें तें हातळुनी लोपिलेंही पुसारिलें ॥ २३९ ॥

पुसिलें कोरडें केलें पुसिलें तें विचारिलें ।
दवावणेंही पुसणें परामर्षहि दादिही ॥ २४० ॥

पाव पाउल चौथाई पुंस पुछहि पुष्यही ।
पैका शब्दें पाव रुका धनाचें जातिनामही ॥ २४१ ॥

पार शब्दें परथडी भेदही आणि चौतरा ।
पारसी थोडसी अस्नात स्त्रीही यवनी लिपी ॥ २४२ ॥

पाहिजे देखिजे व्हावें विचारा आणिजे मनीं ।
पगडा मान्यता पैठी पाश लेखनही तथा ॥ २४३ ॥

पोहे तिरेही पृथुका तरंगे पान छत्रही ।
पडलें पतना गेलें प्रसंगें प्राप्त जाहलें ॥ २४४ ॥

पडलें घडलें आणी पडलें मृत जाहलें ।
पडलें रूडलें आणी वर्षलें पटलें तथा ॥ २४५ ॥

पोकळा तो राजगिरा स्त्रीलिंगीं ढिलिया नळया ।
पक्ष ते कृष्णशुक्लादि महालयहि पंखही ॥ २४६ ॥

पक्ष संमत कैवार जाणिजे संगती परी ।
पारखी स्त्री परावी ते खरें खोटें परीक्षिता ॥ २४७ ॥

पारखावण जे तेही पारखी ह्मणिजेतसे ।
प्रसंग समयो वाद प्रसंगाध्याय जाणिजे ॥ २४८ ॥

ह्मणीतल्या पहुडला निजेलाही प्रवेशला ।
स्त्रीवस्त्रभेद येलील रोडकें होय पातळ ॥ २४९ ॥

जलाधिक्यें कालवला पदार्थु होय पातळ ।
ह्मणीतल्यां पाळण्यांत रक्षणांतहि पाळणां ॥ २५० ॥

पां परंतु पहा पाहूं आश्चर्यार्थी विचारणीं ।
शब्दानुसरुनी अर्थी देत अव्यय रूप पां ॥ २५१ ॥

पाठिंबा पाठिराखाही भाउही होय धाकुटा।
पाठीच्या अनुजा नाम शरणागत म्याडसा.॥ २५२ ॥ ( इति पादि )

फाडोवाडें वेगळें तें आणिखी आडिवा निर्सी।
फरारी दूर जाला तो भासही ध्वजही तथा ॥ २५३ ॥

फांटा लांकूड डाहाळी अंतिची भूलिची गिरा।
फाटा ह्मणितल्यां रद्द विस्तारहि विचक्षणा ॥ २५४ ॥

फड शब्दें प्रसंगार्थ उंसाचा वागही फड।
फड पातळसे कांटे सर्पाची फडिही फड ॥ २५५ ॥

फुडें खरेंही सामोरें वरवेंहि फुडेंच तें।
फळी पाटी खेळभेद फळवंत जमावही ॥ २५६ ॥

फणी फणकुटा नांव फणी रोड विशेषणीं।
केळांची जोडली पंग्ती फणी ह्मणुनि बोलिजे २५७ ॥

फिटणें मोकळें होणें सुटणें लय पावणें।
फुणगी फुटकुळी आणी ठिणगी कळि लावणें ॥ २५८ ॥

फावडें ह्मणिजे खोरें फावडें भेदभावही।
फिरणें प्रतिकूलार्थ होणें सन्मुख विन्मुख ॥ २५९ ॥

फिरणें हिंडणें आणी निघणें परतूनिही।
फुटी नागफडी दीसी फुटी विघड भंगही ॥ २६० ॥

फुलवाण अशा शब्दीं स्मर भूसनळा तथा।
फलाणा अमका आणी चण्याचीं बोंडसें तथा ॥ २६१ ॥

फोडणें भंगणें लोकां फितव्यामाजिं काढणें।
फोडणें ह्मणिजे गोष्टी प्रसिद्ध करणें जनीं ॥ २६२ ॥

फोडी पोफळखंडेंही फळखंडेंहि तैसिंच।
फुटणें वेगळें होणें भंगणें अंकुरावणें ॥ २६३ ॥ ( इति फादि )

बुद्धि प्रज्ञा आणिकही बरवी रीति बोधणें।
बळिया पक्षिभेदांत पुलिंगीं बळवंतही ॥ २६४ ॥

बंद बंदोबस्त आणी अटकाव कसे तथा।
तटणेंही लेखनार्थीं योजली बंद कागदी ॥ २६५ ॥

बाळी मुलीहि कन्याही कर्णभूषणभेदही ।
बाहुली तारका बिंब बाहोली बाहुली तथा ॥ २६६ ॥

बाहुली हिरवें सीत बाहुली बाप रे पिसी ।
बाग बाग अशा शब्दीं बहु बाग बहूपरीं ॥ २६७ ॥

बेल शब्दें बिल्ववृक्ष आणि तत्फळ पत्रही ।
बेल तो वेल जाणावा काष्ठही वळहीणसें ॥ २६८ ॥

बावळी वनबाहुल्य दोंतें बाबळ बोलिजे ।
बुडायाची वेळ आणी बुडदेश बुडस्थळ ॥ २६९ ॥

ह्मणीतल्यां बुडबुडे नारळें खपरीविना ।
जलबुद्बुदही मूळ बुडे तें ह्मणवे तथा ॥ २७० ॥

बरोबरी ह्मणितल्यां सांगातेंहि समानही ।
बसला बैसला आणी दबलाही प्रवर्त्तला ॥ २७१ ॥

बसला तो बडवला बसला शाखभेद तो ।
बेक तें ह्मणिजे जोडी अपरूप पदार्थही ॥ २७२ ॥

बाजू ह्मणितल्यां पार्श्व समयो रक्षणें तथा ।
बोल शब्दें वचनही बोल तो अपवादही ॥ २७३ ॥

बापुडा तो भला आणी बापा साम्य गरीबही ।
विचारवंतही भला बिच्यारा ह्मणिजे तथा ॥ २७४ ॥

बिच्यारा ऐशिया शब्दीं जाणिजे तो गरीबही ।
ह्मणितल्यां बहुगुणें पात्रभेद गुणाढ्यही ॥ २७५ ॥

बदलासी ह्मणीतल्यां वेगळा मी अकीर्तिही ।
बावरी ह्मणिजे वेडी बावरी पितयावरी ॥ २७६ ॥

बाळसें बाळ ऐसेंही बाळाची पुष्टता तथा ।
बाबापसंबोधनही बीं बीजहि समूळही ॥ २७७ ॥

बिक आधिक्य शोभाही आवडी बडिवारही ।
बरळा रुग्ण दुर्मार्गी अन्यथा बोलणारही ॥ २७८ ॥

भ्रांतही भ्रमही ऐसा जाणिजे बरळार्थ हा ।
भोरपी सूत्रबाहोळी दोनीही बहुरूप तें ॥ २७९ ॥

बहुडे ह्मणिजे बोले निरोपी जाथ पाठवी ।
विस्तारीं वेढियामाजीं ईखभेदांत बाहळी ।। २८० ।।

व्यों मार्गींहि भोगींही बीजें येणें बिजें बिगां ।
बुकिलें ठोकिलें खाल्लें बोहरी नाश वोणवा ॥ २८१ ॥
बांगडी ह्मणतां येथें वेशधारीहि कांकण ॥ २८२ ॥

पसारा आणि सामान्य बिसाट ह्मणिजेतसे ।
बावनंबणी सोनें ह्मणिजे त्यासि बावन ॥ २८३ ॥

बापा बन ह्मणूं येल मलयाचल बावन । ( इति बादि )
भुंजे भोगीहि जेवीही भोज शब्दें मनोरथ ॥ २८४ ॥

भोज कौतुक संतोष विक्रमात्मज कंसही ।
भरलें शिरलें व्याप्त भरलें मापमानही ॥ २८५ ॥

भडसाधिक्य इछाही भांडें पात्रहि तोफही ।
भूतें प्राणी पिशाच्येंही आकाशादि गतार्थही ॥ २८६ ॥

भाव भक्ती स्वभावार्थ भांव सौंदर्यही भ्रम ।
भिंगूळसें पिंगट तें अनोळखहि भिंगुळ ॥ २८७ ॥

भूतलामागिला व्याप्त पीडला धरिणीतला ।
भंडार ह्मणिजे कोश हरिद्रारज दिव्य तें ॥ २८८ ॥

भरडा कण पीठाचा पळता आणि पूजकू ।
भार वोझें बहुतही स्वल्पही वजनी तथा ॥ २८९ ॥

भितार्चिता वाहणेंही शैन्यही भार बोलिजे ।
भेद शब्दें अनुभऊ भिन्नता ऐक्यही तथा ॥ २९० ॥

येकमेकीं विघडणें भेदपर्याय जाणिजे ।
ह्मणीतल्या भाक भाषा तैसेंच वरदानही ॥ २९१ ॥

भेटी दर्शनही खेम भेटीचें द्रव्यही तथा ।
भेटीची प्रार्थना ऐक्य दोनीही भेट बोलिजे ॥ २९२ ॥

भुरका झूलिही बुंथी भुरका रंग तो फिका ।
याछादनें वाहनाचीं भुरके फुरके तथा ॥ २९३ ॥

भला उत्कृष्ट साधूही भुरकी भूलिही फिकी ।
भीड दाक्षिण्य संकोच जनाची दाटणी तथा ॥ २९४ ॥

भारी दिसाऊ ह्मणिजे गंभीर गुणयुक्तही ।
भारी ह्मणितल्या अर्थीं जड केवळ आणिजे ॥ २९५ ॥

ह्मणितल्यां भांडयाळ भांडव निज नेत्रणें ।
भिडणें भांडणें आणी मिळणें भिडणेंच तें ॥ २९६ ॥

भिडाऊ जारघटक भिडाउ भयशील तो ।
भर आधिक्य मितही भात अन्नहि धानही ॥ २९७ ॥

भांभ शोभा भास सोय भाष आणांहे वैखरी । ( इति भादि )
मानप्रकार-सन्मान गळपोंठि प्रमाणही ॥ २९८ ॥

मोडी रीती लिपीभेद मढकेळी कळीमठ ।
रुतुशांतीवीण जन्मे मिणधा ह्मणिजे तया ॥ २९९ ॥

मिणधा अंकणा आणी संकोचितहि वंचकू ।
मोटका ह्मणिजे सूक्ष्म मोटका तोचि व्यापक ॥ ३०० ॥

मोकळीक मुक्तदशा वेगळीकहि पस्टता ।
माप शब्दें मिती नाम मापटें माप बोलिजे ॥ ३०१ ॥

माग मार्गु पावलाग उगमू मग बोलिजे ।
कापडांचा प्रसवही माग तो ह्मणिजेतसे ॥ ३०२ ॥

मद मस्ती आणि मधू मुद्रा खूणहि मुद्रिका ।
मोहरा होय सामोरा मोहरा मणिभेदही ॥ ३०३ ॥

मोहरा अस्थि खिळीची मोहरा राजकारणी ।
शिक्यासी आम्रपुष्पासी अश्वके नाम मोहरा ॥ ३०४ ॥

मुहूर्त ह्मणल्या अर्थीं आरंभ प्रहरार्धही ।
मावें पूर्वीं पाठिमावें ह्मोरें कालांतरीं पुढें ॥ ३०५ ॥

मागें पुढें तजविज पहिलें पुढती तथा ।
मोहला भुलला आणी मोहला रूप ठेविही ॥ ३०६ ॥

मार्ग शब्दें बरी चर्या अनुकूलहि वाटही ।
मोह वाछल्य आसक्ती मोह शब्दें मधूकही ॥ ३०७ ॥

माया मत्ता दया आणी मिथ्या कपट मावही ।
मेण शब्दें हल्याराचें घरही मउ मोमही ॥ ३०८ ।

माट मस्ती आणि डेरा मैस शाईहि हैसही ।
माज आधिक्यही मस्ती माज तो मध्यभागही ॥ ३०९ ॥

मासा सुवर्णवजन मासा मछहि जाणिजे ।
माती शब्दें मृत्तिकाही लक्ष्मी ते माव ती तथा ॥ ३१० ॥

ह्मणिजे बोलिजे आणी जाणिजे तें ह्मणालियां ।
मात गोष्टी खेळ जैत मात शब्दीं समावती ॥ ३११ ॥

लग्नाच्या मांडवा आणी लागडा नाम मंडप ।
मुकें मुंकें नुगवतें घरावलें गह्वाक्षही ॥ ३१२ ॥

मूळ तें न्यावया आलें मूळ कारणही मुळी ।
मुठी शब्दें धनुर्मध्य बोटांची कवळी मुठी ॥ ३१३ ॥

शस्त्रादिकांच्या दांड्याही टोंगेंही ह्मणिजे मुटी ।
मोड आकारही भंग मोड अंकुर फुटणें ॥ ३१४ ॥

मोडलें तें विघडलें वठलें चेष्टलें तसें ।
मोडिला होन्न तैं खर्चे बोल जैं तें अनादर ॥ ३१५ ॥

मुंज्या तो ब्रह्मचारीही मुंज्या दैवतही असे ।
ह्मणीतलीयां मकुट माथा आणि किरीटही ॥ ३१६ ॥

मागतीं मागणारें तें मागतीं परतोनिही ।
मेढा ह्मणितल्यां च्याप भारवाही तसाचही ॥ ३१७ ॥

मृदांग मादळा नाम मृदु अंगहि जाणिजे ।
मउ नम्रपणें सेंचे मऊ गुळगुळीतही ॥ ३१८ ॥

मिळालें तें मिसळलें मिळालें लाभलें तसें ।
ह्मणोनी यास्तव असें उच्यारूनिहि जाणिजे ॥ ३१९ ॥

मा थोर आणि आधिक्य काकु आश्चर्य तुछता ।
विचारार्थैंहि दे शब्दां मागें अव्ययरूप मा ॥ ३२० ॥

मात्र शब्दें येत्व वर्णीं मात्र येकचिही कणी । ( इति मादि )
हठादि योग तो योग योग ऐश्वर्य संगतीं ॥ ३२१ ॥

येक शब्दें मुख्य येर येतें पावेल पावलें ।
ह्मणीतल्यां येकदंम येके काळींच सर्वही ॥ ३२२ ॥

येकदां रोधिला स्वास ह्मणिजे येकदंम तो ।
येकाउणें दोहा पूर्ष्यीं नवही ह्मणिजेत ते ॥ ३२३ ॥

या या तें बाहते ठाईं पदपूर्तीवरी असे । ( इति यादि )
रंग रम्य स्थळा नाम श्रीरंगप्रभुसन्निधी ॥ ३२४ ॥

रंग उछवही होय पंचवर्णेहि रंग ते ।
रोहिणी चंद्रभार्या ते रोहिणी मृगतोयही ॥ ३२५ ॥

रोही ह्मणोनियां पक्षी तत्पत्नी होय रोहिणी ।
राव ने इक्षुचा पाकःराव तो रावता तथा ॥ ३२६ ॥

राखणें रक्षणें आणी नि.गेंत वळणें तथा ।
सांभाळणें राखणें तें निरुपद्रव ठेवणें ॥ ३२७ ॥

रवा सत्यार्थ कणिक रवा ह्मणितल्यां रुडा ।
रोख शब्दें न्याहळणें रोकडें आणि इंगित ॥ ३२८ ॥

रेजावट कणा आणी पगडा येकही तथा ।
रोजगार प्रतिदिना उद्योगासहि बोलिजे ॥ ३२९ ॥

राऊळ शब्दें राजाही राजगृहहि राउळ ।
रेवणी ह्मणिजे बाकी खंदकापुडिला कडा ॥ ३३० ॥

रेवती तटती तारा राव प्रभुहि रावणें ।
रजस्वल पार्थही धूळीकण आणि रजोगुण ॥ ३३१ ॥

रति प्रीतिहि संभोग स्मरयोषा रती तथा ।
स्वल्पसी वजनी तेंही हिऱ्याची तुळणी रती ॥ ३३२ ॥

रग मस्ती आणि शिरा रत्न सद्गुण माणिक ।
रण शब्दें नाश आणि युद्धाचें स्थळही रण ॥ ३३३ ॥

रेवलें तटलें आणी लांचलें रुतलें तथा ।
रंक साधकही दीन राहे थांबे वसे तटे ॥ ३३४ ॥ ( इति रेफादि )

लाहणें नें धारजिणें ग्राह्याचें लभ्यही तथा ।
लांडें जघन्य अखुड लव स्वल्पहि रोमही ॥ ३३५ ॥

लाणी ते प्राप्ति मर्यादा आणि सावडणें तथा ।
लोहा लोखंडही शस्त्र निक्षेप कढई तथा ॥ ३३६ ॥

लाहे किंमतीही आणि स्त्रीलिंगीं प्राप्ति बोलिजे।
लांव शब्दें लांडगीही पिशाची बालभक्षिणी ॥ ३३७ ॥

लेखा आकार गणना लेई खाई मानणें।
लावणें लेपणें आणी रोवणेंहि अरोपणें ॥ ३३८ ॥

लावणें प्रेरणें आणी पेरणें स्पर्शणें तथा।
लाविलें तें चेतवीलें धाडिलें जोडिलें तसें ॥ ३३९ ॥

गच्याचे प्रतिमे चित्रा आलेपा लेपु बोलिजे।
लावत्री तो उणीवेचा विनयें बौढिता मना ॥ ३४० ॥

विद्याप्रसंगीं जलद ज्याड्यारहित लाघवी।
लागेल तें आवडतें झोंबतेंही प्रवर्ततें ॥ ३४१ ॥

लेसें तें चांगलें आणी लेउं येसेंहि जाणिजे।
लेश शब्दें स्वल्प आणी तीरामविल भेदही ॥ ३४२ ॥

लागलें तें वडवलें लाभलें स्पर्शलें तसें।
रूढलें तगलें रोप खचैलेंही सर्वेंच तें ॥ ३४३ ॥

लागले जडले जिरले मिळाले भासले तसे।
लगामवशता अश्वमुखींची कडियाळिही ॥ ३४४ ॥

लक्ष्य तें गण्यही रोख संख्या शतसहस्रही।
लाख लाक्षा आणि लक्ष लोभ कार्पण्यही दया ॥ ३४५ ॥

ह्मणीतलियां लगट धांवणें सीघ्रता तथा।
लागावा झगटावा तो नातें स्नेहानुबंधही ॥ ३४६ ॥

ह्मणीतल्यां लवकरी सीघ्र लेश करी तथा।
लावणें रोवणें आणि स्पर्शणें मांडणें तथा ॥३४७॥ (इति लकारादि)

वोलांडणें जें पडणें दोनी वोवांडणेंचि तें।
वोलांडणें ह्मणीतल्यां उतारा टाकिला विदीं ॥ ३४८ ॥

ह्मणीतल्यां वानिवसें स्वरूप सधिलें घरा।
व्याज वुधांग वेव्हार कळांतर निमित्तही ॥ ३४९ ॥

वावरे ह्मणिजे भेटे विस्तारे डंडळे तथा।
वोटंगणें लागणें तें आणि पातेजणें तथा ॥ ३५० ॥

वोटंगणें ह्मणितल्यां लोडही आणि आश्रय।
ह्मणीतळीयां वेकाळ विलंब समयो तथा ॥ ३५१ ॥

ह्मणीतळीयां व्यसन चिंताही चटही तथा।
विरूं द्वेषु आणि भेद व्यभिच्यार विरुध्दही ॥ ३५२ ॥

वोळगे ह्मणतां पावे कृपावे वशही भजे।
व्यक्तिप्रभा ते विवळ व्यक्ति मूर्तिहि दृश्यही ॥ ३५३ ॥

वागुरा ह्मणतां होय जाळेंही आणि पाशही।
वडवाळी ग्रास गोळे वानीं वर्णीं कसीं समीं ॥ ३५४ ॥

विचंवू उपहासार्थे श्रमही ह्मणिजेतसे।
विंदाणें तें दगाबाजी योग कौतुक निग्रहो ॥ ३५५ ॥

वोजा ह्मणितल्यां चांग प्रकारहि तथाप्रती।
वेखासें श्रम वाईट येखादें व्यर्थ येरही ॥ ३५६ ॥

विधि ब्रह्मा दृष्टशास्त्र वळसा कांत भोवरा।
वोभाणें नइचा वेग वोसणें केर कस्पट ॥ ३५७ ॥

वाड आधिक्यही फार वोडणें ढाल टोणपा।
वोढणें प्रीति करणें आणि आकर्षणें तथा ॥ ३५८ ॥

वोरस प्रेम पान्हाही प्रीतीही विरसार्थही।
विल्हळू ऐसिया शब्दीं विलास उपच्यारही ॥ ३५९ ॥

वेळाउळ अशा शब्दीं लतामंडप भूरही।
वीट विटकर कंटाळा विसुरा श्रम विस्मय ॥ ३६० ॥

वारलें मृत निर्व्याज्य वाहिनी धोरणी नदी।
वही ते सिविली पोथी अटकाव बकारही ॥ ३६१ ॥

ह्मणीतलीयां विट्ठल विजातीयहि डांकही।
वालीप ते गवसणी आणि वालीप झिल्लट ॥ ३६२ ॥

वारी धंदा पसाराही गांवची येक मोहरी।
वार संबंधिनी वारी पाळी आणि निवारितें ॥ ३६३ ॥

वैह्याळी पारधी कावा वीणा वीणा विना तथा।
वैरिलें ग्रासिलें तैसें ग्रास केलेंहि घातलें ॥ ३६४ ॥

वोझें ह्मणितल्यां भार श्रितार्चितेस वाहणें ।
वाहे पुष्पादिकें अर्पी स्वयें आगोंधरी तसा ॥ ३६५ ॥

जळीं वाहुनि जातांही कलहार्थ उतावळे ।
वाढणें पावणें वृध्दी अन्नें पात्रीं समर्पणें ॥ ३६६ ॥

विरजा व्यापकू साह्य दुसरा विरजा नदी ।
वोडाळू वोंगळू आणी आस्थावंतहि जाणिजे ॥ ३६७ ॥

वांकडा रुसला वक्र कृष्णमित्रांत येक तो ।
वादी दाली बकारादी रसवादी विवादता ॥ ३६८ ॥

वार वारसही घाव वीर दैवत शूरही ।
वैराळू शत्रु कांसार वैर दावाहि वज्रही ॥ ३६९ ॥

ह्मणीतल्यां वरगणीं वांटणी जाणिजेतसे ।
प्राप्ति ते लाभ न्दष्टीची विभागा पावणें तथा ॥ ३७० ॥

हवालगीर लोकांची श्रेणी ते वर्गणी ह्मणी ।
वाणी भाषा वर्तकही कीटभेदहि साम्यही ॥ ३७१ ॥

वास शब्दें सुगंधार्थ वसती भेटि इछणें ।
वास शब्दें अपेक्षेच्या पूर्तीची वाट पाहणें ॥ ३७२ ॥

वाट पंथा उगवणी शास्त्रमार्गहि जाणिजे ।
वाजतें गाजतें आणी वाजतें लागतें तसें ॥ ३७३ ॥

वल्ली गुणाढ्य गुळिका षण्मुख स्त्रीहि सिद्धही ।
वळी शब्दें वेग पंक्ती वोढी तटहि वोढणें ॥ ३७४ ॥

वोरवारा उबाराही सुखदुःखहि जाणिजे ।
वेड वेडें आणि आस्था शिक्यारहित जे मुदी ॥ ३७५ ॥

विरळा अपरूपत्वें आणि व्यत्यस्थही तथा ।
वेधू ह्मणितल्यां ध्यास तन्मयत्वहि वेधु तो ॥ ३७६ ॥

स्वल्प आक्रमिल्या अन्यें वेधु तो ह्मणिजेतसे ।
वाटे ह्मणितल्यां भासे पथींही रगडे तसें ॥ ३७७ ॥

वोल शब्दें पेहरणी आणि आस्तिक्य आर्द्रता ।
वेळ ते काळपर्याय अत्यंत समयो तथा ॥ ३७८ ॥

वेंचिलें तें निवडिलें घेतलें जें पुनः पुन्हां ।
सिंपाइलें येत्यानें तें थोडकेंहि सिंपाइलें ॥ ३७९ ॥

वरूनि अंगिकारूनी बाजूनें प्रगुनी तथा ।
ऊचोनि हेथ्यें स्फुरलें वरुनी ह्मणिजे तया ॥ ३८० ॥

वृंदावन अशा शब्दीं नाश इंद्रावणासही ।
वृंदेचें वन पूज्यत्वें तुळसीरक्षणस्थळ ॥ ३८१ ॥

वांकडी वक्रता स्त्रीत्वीं अतूट झडि वांकडी ।
वोड्यापुढील घासातें दाण्यातें जांतिया मुखीं ॥ ३८२ ॥

दळावया घातलेया नामें दोहींस वैरण ।
वऱ्हाड ह्मणिजे लग्न लग्नाची मिर्वणी तथा ॥ ३८३ ॥

वऱ्हाड शुष्कदेही तो कश्चिद्देशास नामही ।
वर श्रेष्ठ उंच भर्ता वरदानहि जाणिजे ॥ ३८४ ॥

बहिरंगहि बोलं ये आतां शब्दांसवें कथूं ।
वरखर्चे चिल्लर तें त्यावर तदनंतरें ॥ ३८५ ॥

तोंवर तंवपर्यंत फलमावर फल्लसें ।
कामावर तत्पर तें आसनावर आसनीं ॥ ३८६ ॥

सेवटोर समग्रार्थे वरार्थे बहु यापरीं । ( इति वादि )
शेल श्रेष्ट आणि भाक शंख संख्याहि संखही ॥ ३८७ ॥

शंका ते भूलबाधाही शंका वचकही तथा ।
शील शिष्ट शिळा आणी पश्चार्थीं मुखबाधही ॥ ३८८ ॥

शासनें साधनें आणी सीक्षणें सनदा तथा ।
शिलीक ह्मणिजे बाकी शिलीक ह्मणिजे विले ॥ ३८९ ॥

शुध्दि पावनता शोध शुद्ध निःखळ पावन ।
शोध शोधा परामर्ष शील शीळ न साजुक ॥ ३९० ॥

शून्य नास्तिक्यही पूजी टोणेंही ह्मणिजे तथा ।
सूड शब्दें उकाळाही सारण्याप्रति सारणें ॥ ३९१ ॥

शब्द वाक्य ध्वनी आणी शब्द तो अपवादही ।
शेर तो आठ नौ टांकी शेंडही आणि वर्चेड ॥ ३९२ ॥

शाहा गुन्हाहि आणीक सतरंज निरोधही ।
शांति तृप्ति क्षमारूप निश्चळत्वहि बोहरी ॥ ३९३ ॥ ( इति शादि )

साजणें शोभणें मैत्री साजणें तें साहा जणें ।
सेंडी आधिक्य गोवाही शेर ताटीहि चेंडकी ॥ ३९४ ॥

सरहार तथा वैल श्रेष्ठसाध्य निरोपही ।
सलनामें डाचितें तें सोपाधी गर्भही सल ॥ ३९५ ॥

साधारण तसें साधें ती संखेसहि बोलिजे ।
सीत स्थैर्य चिला आणी सिजला येक तांदुळ ॥ ३९६ ॥

सोपें सुलभ जाणावें मसीचें चिंधकूटही ।
सोपा सुलभ शालाही सखें सजण सारिखें ॥ ३९७ ॥

सवंग धारण सुधी सवंग कथिलें बहु ।
संत साधू आणि शांत मृतभावहि निश्चळ ॥ ३९८ ॥

साधुत्वीं मृतता कैसी निरहंकार यास्तव ।
संगती अन्वयो आणी संगती सहवासही ॥ ३९९ ॥

सडके बिरुदें आणी भूषणें पदराग्रही ।
समस्या ह्मणिजे कोडें समस्या शक्ति मस्तिही ॥ ४०० ॥

सलाखयुक्त लाखेसी ह्मणीजेल शलाकही ।
सासा सामान अटक सटवी पांचवी शिवी ॥ ४०१ ॥

साउमा ह्मणिजे तैंच ह्मणिजेल समोरही ।
सुवासु सुष्ट वसती ह्मणवेल सुगंधही ॥ ४०२ ॥

सूदलें घालिजेलें तें पाहिजेलें प्रवर्त्तलें ।
सुभा तो मामलाभेद आरोपणें तथा ॥ ४०३ ॥

सिंग तें वाद्यभेदांत सिंव्हही शृंगही तथा ।
प्रभात आणि माध्यान्ह साईकाळहि सांज ते ॥ ४०४ ॥

सुरंग चांगला रंग भोईआंतील वाटही ।
सुख सौख्यहि निद्राही सार सारांश अंवश ॥ ४०५ ॥

सावकाश अशा शब्दीं स्थिरताही उदंडही ।
सुमार सगळी संख्या सरळा अग्रमार्ग जो ॥ ४०६ ॥

मिति स्थिति गती लक्ष सुष्टमार सुमार तो ।
सारी निवारी संपारी आटोपी नकली तथा ॥ ४०७ ॥

साळखी सोंकटें सारी स्त्राल्वीं संपूर्णसा रिपू ।
सरखी सारिखी आणी तथा कार्पासबीजहीं ॥ ४०८ ॥

स्वभावें आपुल्या भावें स्वभावें सहजीं तथा ।
ह्मणीतलीयां सनग सहीत नग कापड ॥ ४०९ ॥

सोनें ह्मणितल्या स्वर्ण शमी आणि गुणाढ्यही ।
सगूण सगुणी आणी गुणासहितही तथा ॥ ४१० ॥

सपूर तेंचि संपूर्ण आणि बारीक वस्त्रही ।
अहेव चांगुलपण दोंतें सौभाग्य बोलिजे ॥ ४११ ॥

सिध्ध हाजीर मुस्तैद सिध्ध सेव्य पदार्थही ।
आणीक सिध्ध पुरुष जाणिजे स्वतसिध्धही ॥ ४१२ ॥

संस्था आचारमर्यादा सैंव केवळ संघही ।
सावेसा ह्मणिजे स्वेछा अभिलाषहि जाणिजे ॥ ४१३ ॥

सावाव साच सबळ सावाव लटिकें साहा ।
सावावो ह्मणत्या शब्दीं वृध्दि आणि साहाय्यही ॥ ४१४ ॥

सोय स्वरूप स्मरण मार्गही वळखी तथा ।
संसरा लाभ विस्तार मार्गानुसरणादिहीं ॥ ४१५ ॥

संसरा ऐशिया शब्दीं योग्यता आणि दर्शन ।
सुध्दि स्मरणही शोध सटी सटविकारणें ॥ ४१६ ॥

सळ क्षोभु छळनही द्वेशही ह्मणिजे सळ ।
सळ शल्यहि जाणावें खड्गाचें विरडें सळ ॥ ४१७ ॥

संसार वरवें सार आपुला परिवारही ।
सारिखें युक्त सदश सावो साचा तथा खरें ॥ ४१८ ॥

सांसीनला तो भरला आणि विस्तारला तसा ।
सांसीनला अशा शब्दीं ह्मणिजेल सजावला ॥ ४१९ ॥

सरतें सासतें तेंची खर्चतें आणि चालतें ।
सामर्थ्यें निभतें तैसें सरतें ह्मणवोनि घे ॥ ४२० ॥

सरतें ह्मणिजे श्रेष्ठ सरतें सुटतें तथा ।
संघटा संध आणीक संवटा घटना तथा ॥ ४२१ ॥

सोडिला त्यागिला मुक्त केलाही प्रेरिला तसा ।
सोडिलें तें उकलिलें दत्त केलेंहि सोडिलें ॥ ४२२ ॥

साटी ह्मणिही साम्य संज्ञा संकेतनामही ।
ह्मणीतलीयां सरस रसिक आणि चांगही ॥ ४२३ ॥

सुटला सरला आणी निघालाही प्रवर्त्तला ।
सुटला मुक्त जालाही सैलही संगती परी ॥ ४२४ ॥

ह्मणोतलीयां सधर दृढही धैर्यवंतही ।
खतान्याचा रुंख आणी इंद्रजालहि साबरी ॥ ४२५ ॥

संहरी आवरी मारी सत्व धैर्य तथा गुण ।
सवा इछे सखे मार्गें परीही ह्मणिजेतसे ॥ ४२६ ॥

सुती वाली वास करी दोन्याचा ह्मणिजे सुती ।
सरली ते नीट वाट गानालंकारही तथा ॥ ४२७ ॥

सरली ते मोकळीक विनोदसहित स्थिती ।
सडा सिटकाववाहुल्य सडा येकटही तथा ॥ ४२८ ॥

सडिया आइता आणी बिनसामान येकट ।
सांगडें साह्य योगेंही तारूंही होय सांगडें ॥ ४२९ ॥

सांगडें सारिखें आणी आंगड्यासहितार्थही ।
सिनसाळें ह्मणितल्यां पडायाचें क्षणीकही ॥ ४३० ॥

सुम्रावा पायगुणही शुभचिन्हहि जाणिजे ।
सुभे पडे घालिजेही साद इछा तथा स्वर ॥ ४३१ ॥

सुणा कुत्रा आणि व्यर्थ सुजे रोगे फुगे सुचे । ( इति सादि )
हन शब्दीं कीं ह्मणू ये जें कांही मगही ह्मणी ॥ ४३२ ॥

स्वभावोही हो कदाचित् इत्यादि अथवा जरी ।
हियें हृदयही आढ्य वाळणें धैर्य टाकणें ॥ ४३३ ॥

हवाव शोभा विश्रांती हारि पंक्ति अपेक्षही ।
हिवसें सीतळी रूढी चंद्राच्या किरणा असे ॥ ४३४ ॥

सीतोपाधीसही लोकीं हिवसें ह्मणिजेतसे ।
हीर तें सत्वही वज्र काचेंही हीर बोलिजे ॥ ४३५ ॥

हीर डावहि भस्तीही कणही धैर्यही तथा ।
हसूं हासें फजीतीही हातीं स्वाधीन हस्तकीं ॥ ४३६ ॥

हात हस्तक अटकाव हर तो भलता शिवें ।
हिरवें पाचिचा वर्ण काचेंही हिरवें तथा ॥ ४३७ ॥

ह्मणीतल्यां हिरवट हिवें काचें असंगत ।
हलकें हलतें तैसें येलील ह्मणवेल तें ॥ ४३८ ॥

ह्मणीतलीयां हलकें हळुवार असें कळों ।
हां ऐसें मानलें चित्ता हां शब्दीं होयही वरें ॥ ४३९ ॥

असा आश्चर्यही आणी हां शब्दार्थीं दवाचणी । ( इति हादि )
क्षमा पृथ्वी साहणेंही क्षार खारट तिख्खट ॥ ४४० ॥ ( इति क्षादि )
भाषांबुधींचे आणिखी शब्दार्थ बहुता परीं ।
नेणता बोलिलों कांहीं परिसोत दयाळु ते ॥ ४४१ ॥

॥ इति श्रीनृसिंव्हानुचर रामकविविरचित भाषाप्रकाशे नानार्थवर्ग समाप्तः ॥

* * *

# वर्ग दहावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ अंगव[illegible] आरंभ ॥
डोकें दोकें डोई दोई दोसकें डासकें तथा।
शीस डोस्कें डोचकेंही तें डोंबल नपूंसकीं ॥ १ ॥

पाऊ तेंचि पाऊल पाव तो पाय तो तथा।
टाळू ते निमथा माथा टाळकें चवरें तथा ॥ २ ॥

मुगुट तें तेंच मुंड समसंस्कृत मस्तक।
जनामध्यें भंडवाणें बोलूं नये हीणोनियां ॥ ३ ॥

अपसव्या कथूं कांहीं वस्त्राआडील वस्तुवा।
णाट, णाच हि पुल्लिंगीं, काना, ळेंपट तेंच तें ॥ ४ ॥

योनीचें नाम यवनी गुह्य ढोंसाहि बोलिजे।
रिदफो, ते फोच्चि'दापू तचू ते लेंगुमें कभो ॥ ५ ॥

पिंदा पेंदा वळें खाली, बोचा, गाडीहि गाडिही।
आतां डाकलाहि डालौ टचोंली बुगिलुं तथा ॥ ६ ॥

लेंगुनेही लेंकुटचों णेंगडें णेंमचो, तथा।
नपुंसकीं तळवट बेगा पुल्लिंग बोलिजे ॥ ७ ॥

डाका उघड पोता तो, तोंड कांदाहि फूल तें।
डर्भा लेंकुडर्भा, त्याचे गोळे ह्मणवती बिया ॥ ८ ॥

बिया प्रधान मिळुनी धडूत्री फळ बोलती।
गुदगुह्या मध्यभागीं सिवणी ह्मणिजेतसे ॥ ९ ॥

चुंबनें सम गीर्वाण दाम मुक्का हि उंमुही ॥ १० ॥
मुखोटा तो मुखवटा मुखाची ठेवि जाणिजे।
मुख तें तोंड तें सारें वदनाचेंहि नांव तें ॥ ११ ॥

जिवळी प्रांत होंटाचे होंट वोंठ ते तथा।
मुंगा तोंडवळेंही तें स्वल्प रूढीमधें कळो ॥ १२ ॥

दांतावरील जें मांस हिरड्या ह्मणिजेत त्या।
दाढावरील जें मांसें अवाळें ह्मणिजेत तें ॥ १३ ॥

जिभली जीवली जीव जीभही ह्मणिजेतसे ।
टाळूप्रांतीं वक्राद्वारीं लागली पडजीव ते ॥ १४ ॥

दों दाढांमधिले आगी वरिले भाग गाल ते ।
तळहोंटास तळिचा भाग तो बोलिजे हनु ॥ १५ ॥

हनोटीही हनुवटी आणी हनवटी तथा ।
सेंट तें श्मश्रु बोलावें केश ते केंस ते तथा ॥ १६ ॥

काळे ते भोंवरे केंस लव ते लोम रोमही ।
ह्मणावे तेच कुरुळ वर्तुळाकार वांकडे ॥ १७ ॥

गुदाचें नाम नरक मळही बोलिजेतसे ।
त्याचें बाहुल्य जें तेंचि नरकाडी ह्मणोनि घे ॥ १८ ॥

धात तें रेत जाणावें वाटोणी सूत्र मूतही ।
वातादि मुख्या तीं नाड्या अन्य तैशा सिरा रगा ॥ १९ ॥

नाकोटें नाकपुडि ते घ्राणाचें नांव नाक तें ।
दों नाकपुडीमधील भिंती सेवट तो बुणा ॥ २० ॥

पाउला माघिला भाग पायरा आणि टांच ते ।
डोळा दोळाहि ह्मणिजे डोलत्या बुभळासुळें ॥ २१ ॥

दिठ तें दृष्ट तें दृश्य त्या दावी दिठवा तसा ।
दशा पाहे तसी खीर्वी दिटीही दृष्टिही तथा ॥ २२ ॥

जे दिठा तें दाखवी तें दिठवी ह्मणिजे तिये ।
कान तो दांड तो आणी कानाची पाळि पाति ते ॥ २३ ॥

कानाची तेंचि कानोटी कानापुढिल भागहि ।
कानाच्या मध्यभागाचा पुढारू कानसूल तें ॥ २४ ॥

जिव्होर्ध्व भाग ते टाळू दांत दंत सुखावधि ।
दोंकडे दों वळीसाजीं चौकीचे च्यारि त्यामधे ॥ २५ ॥

मुखविस्तार जभडा दाढा त्यासी पलीकडे ।
दाढेचा जो अधोभाग तेंचि थोबाड थोबडी ॥ २६ ॥

दों दाढमधिला भाग गाल तो ह्मणिजेतसे ।
घोटें तें तेंच घाटीही गळ्यामधिल टेंक जें ॥ २७ ॥

तोचि जागा घोटनळा नरडी त्यासि खालती ।
डोळ्यांत खालिल्या दर्शी भागाचें नांव कोर ते ॥ २८ ॥

चामत्यावरिलें पातें तोचि पलक पांपणी ।
पंचांगुळाची मिळणी डोणीसम घडे तरी ॥ २९ ॥

कुडता तो पसाही तो पचा तो तेच खोंकही ।
मिळालीयां दोनी पसे तेचि वोंझळ बोलिजे ॥ ३० ॥

नाकाचा जो अगरडा बोडी त्याप्रति बोलिजे ।
कढूसाखालत्या मागें ढुंग तें तेच टीरही ॥ ३१ ॥

मांडीचें मूळ टीरींत हाड जें तेंच ढोंपुर ।
कानाचें बीळ बिरकें बूड चापाहि लोळकी ॥ ३२ ॥

कानाच्या भोंवता काठ पाळी ते पातिही तथा ।
कानाखालील बाजूचा गळा गर्दन ते कळो ॥ ३३ ॥

घांसातें गळवी पोटीं ह्मणुनी ह्मणिजे गळा ।
स्वरा डोईस आधार ह्मणुनी कंठ बोलिजे ॥ ३४ ॥

कंठाभरण तें कंठी ऐसाही कंठ प्राकृतीं ।
कफेंसीं दाटुनी घोरे यामुळे घर्नला गळा ॥ ३५ ॥

गळ्यांतील ध्वनी साद स्वर कंठ गळा घसा ।
मुळी गळ्याची नरडी आंतील पोकळी घसा ॥ ३६ ॥

उरावरी गळ्याखालें कांठमोरा दुहीं हडीं ।
तयामधें धुकधुकी स्वल्प गारि गळ्यामुळीं ॥ ३७ ॥

मानेच्या वरल्या भागीं बोडक्या खालिल्या स्थळीं ।
संधि जे तेच बोकांडी शेंडी जूटहि चेंडकी ॥ ३८ ॥

हातपावां आंतिल्यांगीं माजोनियां गळावधी ।
अंग तें कोथळा नामें तोचि कोथळ बोलिजे ॥ ३९ ॥

कण्यासी वरती मान कांठमोऱ्यावरी गळा ।
पोटांतील कोशभाग कोठार ह्मणिजे तया ॥ ४० ॥

भुजेपासूनिया पंजा कर हात ह्मणोनि घे ।
पंच्यांगुळीयुक्त पंजा हातही ह्मणिजे तया ॥ ४१ ॥

अग्रभागस्थ आंगोठा अंगोठा अंगठा तथा ।
आंगोळ्या अंगुळ्या बोटें पांचही सामुदायकीं ॥ ४२ ॥

पदंगुळी सेवटील डराभेदें करंगुळी ।
कडेच्या करिच्या बोटा ह्मणिजेत करंगुळी ॥ ४३ ॥

करिच्या अंगुळ्या सर्वै सांगावी कां कनिष्टिका ।
ह्मणाल संखेसीं पुढें आली तें हे करंगुळी ॥ ४४ ॥

चवणा नांव दाढेंत चावायाच्या स्थळाप्रती ।
कपाळ भाळ निढळ हें तीनीहि नपूंसकीं ॥ ४५ ॥

बोटाचे वरिले भाग वोटुकें ह्मणिजेत तें ।
खिळयासी युक्त कांडोरीं कांड्याही ह्मणिजेत त्या ॥ ४६ ॥

अंगुष्ठाग्रा नाम गोधा तळीं गोधूम चिन्हही ।
वीरगुंठी ह्मणविती झुलप्या उंच बांधल्या ॥ ४७ ॥

मुखाचा माथिला भाग नाकडोळयादिकां विना ।
यासाटीं नांव त्या आलें बोडकें ह्मणवोनियां ॥ ४८ ॥

अनांगोठा चवंग ते जे मुठी चउ अंगुळीं ।
करंगुळीपासुनी तीं बोटें नामांकितें कथूं ॥ ४९ ॥

मरणा लागली योगीं दाविते ते मरंगु ।
अड मध्यम तें वासा घरामधिल तें अडें ॥ ५० ॥

पंज्यामधील तें बोट ह्मणवोनी अडंगुळी ।
अरंगुळी असी रूढी डराभेदेंकडूनियां ॥ ५१ ॥

चौबोट-मिळणी चापा त्या बाजू कळिकोर जे ।
आंगोठयापासिलें बोट तेंच चापेकळी कळो ॥ ५२ ॥

खेळांत यापरी नामें नेमी बालसरस्वती ।
तळहात हाता मध्यभाग चवडा अंगुळीविना ॥ ५३ ॥

तेंचि नामें मणगट मणीरूपास्थि ज्या स्थळीं ।
मणिबंधापासुनियां पावेतों कोंपुराप्रती ॥ ५४ ॥

काविखाप असें नाम तियेचें पोट पोठरी ।
नपुंसकीं आगवखें तोच अंगप्रदेशही ॥ ५५ ॥

गळबाजूप्रती खालें खांदा ह्मणुनि बोलिजे ।
त्याची बाजूच तो भूज गुंडा तो ह्मणिजेतसे ॥ ५६ ॥

त्या खालें दंड जाणावा त्याचें पोटचि पेंढरी ।
खांद्याखालें भुजेभांत संधि ते काख बोलिजे ॥ ५७ ॥

तेंचि जाणा बगलही बगडीं तीस खालती ।
बगडीं खालती कूसी ती खालें माज तो कळो ॥ ५८ ॥

माजाचें नाम कमर स्त्रीलिंगीं बोलिजेतसे ।
माजासी पुढिले भागावरती नाभि बोंचि ते ॥ ५९ ॥

भुजेपासुनी कोंपुर बाहे ते बाहु तो तथा ।
कोंपुराची पाठी जे तेंही ढोंपुर बोलिजे ॥ ६० ॥

खांद्यापाठीं खवाटा तो खवाडी ह्मणवीतसे ।
उरासीं दोनि ह्यतांचा पसरू वांव ते कळो ॥ ६१ ॥

दों कुसीमाजिं तें पोट दराही ह्मणिजेतसे ।
माजाखालें वाम सव्य भाग तेंचि कडुस्तरें ॥ ६२ ॥

कडुस्ताचें हाड जें तें पाठसी ह्मणवी तिढें ।
दों तिढ्यांमधील भागीं नामें माकडहाड तें ॥ ६३ ॥

पाठीचें मधिलें हाड कणा वांसा ह्मणोनि हे ।
पोटाचा वरिला भाग ऊर तो देवपाटही ॥ ६४ ॥

उराचे तख ते दोनी दों बाजूप्रति रुंदियें ।
त्या दोंकडे मांसगोळ स्तनें थानें थनेंहि ते ॥ ६५ ॥

स्त्रीस्तना नाम पुल्लिंगीं रूढलें ऊरही असें ।
शिंक्यापरी केशगुंफ गुंथा तो ह्मणिजेतसे ॥ ६६ ॥

वेंठोनि खोंवणें केंस खोंपा तो बुचडा तथा ।
त्रिभागीं विणितां केंस वेणी ते ह्मणवोनि घे ॥ ६७ ॥

केंसाचे बांधितां सेंडे सेंडी ते ह्मणवीतसे ।
मलत्या बाजुचें अंग फरा तो ह्मणवीतसे ॥ ६८ ॥

करंगुळीनें आंगोठ्या लांबीची वीति बोलिजे ।
चांपेकळीनें अंगोठ्या लांबीची टींच बोलिजे ॥ ६९ ॥

कोंपुरापासुनि लांबी मधीलें बोहात तो ।
गळ्याचे ठाइं जैं टिंच लागते ढकलावया ॥ ७० ॥

तदा टिंचेस ये नाम, गिचंडी ह्मणवोनियां ।
पोटाचा माधिला भाग पाठी ते ह्मणवीतसे ॥ ७१ ॥

डोईची खापरी जे ते कवटी ह्मणिजेतसे ।
कपाळावरी टाळूंत भांग केंसदुभागणी ॥ ७२ ॥

नाकींचा मळ सेंबूड तोच मेकुड वाळल्यां ।
दारणा डोइची माती अंगींचा मळ ते मळीं ॥ ७३ ॥

डोळ्याचीं चिपडीं गू तो कानींचा मळ मोळ तो ।
दांतींचा कुरसा होय मळ नामें अशापरीं ॥ ७४ ॥

सुग्रावा पायगुण तो आंगोठा आंगरक्षण ।
विना अवयवें गोळा मांसाचा निरुपाधिकु ॥ ७५ ॥

अवाळू ह्मणिजे त्यास वाढीही ज्याप्रती नसे ।
मांडी गुह्या मध्यभागीं जांघ ते ह्मणिजेतसे ॥ ७६ ॥

कडुसा खालती मांडी गुडघा तीस खालता ।
गुडघ्यावरिलें हाड वाटी ते चीप ते तथा ॥ ७७ ॥

गुडघ्याखालिलें हाड नळी पिंडीहि पिंडरी ॥
पिंडीमागें पोटली ते पोटरी ह्मणिजेतसे ॥ ७८ ॥

संधीं खिळ्याचीं जें हाडें मोहरे ह्मणिजेत ते ।
घोट्यापासुनि जांघेसीं टांगडी टांगही तथा ॥ ७९ ॥

॥ इति अंगवर्ग समाप्तः ॥

* * *

# वर्ग अकरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ भाषाप्रकाशीं नरप्रकृति वर्ग आरंभ ॥

राजबिंडा ह्मणितल्यां चांगला राजगभेसा ।
धीवा म:टही तोची धीमाही ह्मणिजे तया ॥ १ ॥

दांडगा बेथ सदट धो आणिक धटिंगण ।
सत्वभावो न विटे ज्याचा अवीट ह्मणिजे तया ॥२ ॥

मतिमंदु मदट तो मूढ तो धड्ड टोणपा ।
गंव्हारही गहिसही गाउदी ह्मणिजे तया ॥ ३ ॥

गरीब दुबळा दीन तोच येळील बापुडा ।
फाटका तो उणीवेचा तुटका रोड रोडका ॥ ४ ॥

हिंगो तो विषयासक्त गाठा तो गाठणार जो ।
मजूर ह्मणियाडें तें दूत किंकर डिंगर ॥ ५ ॥

बंदा गुलामही दास उळिगा परिचारक ।
आज्ञाधार हुकुम्दाज संधीं शेवक चाकर ॥ ६ ॥

बळिष्ट बळियाडा तो वांठुही बळवंतही ।
शक्तही आणि सखत निबडा धडधाकड ॥ ७ ॥

धकाकितु तोचि दृढ ............... ॥ ८ ॥

न सीक्षीजेलें वडिलीं लोकरुढी न लागलें ।
सहिंब ह्मणिजे त्यास ............... ॥ ९ ॥

आळसी सुंद निसुगें गमखोर गमदा सडें ।
हुलें हुलें वावळेंही कावरेंबावरें तथा ॥ १० ॥

वेडया सखें वेडसर वेडें तेंच पिसें बुरू ।
वाहळी ह्मणिजे तोच बरळू तोच जाणिजे ॥ ११ ॥

भोरपी वेशधारीही सोंगी पुलिंग हे तिचे ।
थाइखोरामधें थोर सोंग मल्ला ह्मणोनि घे ॥ १२ ॥

जो ब्रह्मींच तत्परु तया निजगडा नाम
स्वेछाचारी अपल्वंड वेगाडा वेगवंत तो ।
कोटगें तें लत्तकुटें पेळू निःसत्व जाणिजे ॥ १३ ॥

त्रितापें पोळली वाटे ते तडीतापडीहि ते ।
यात्रेकरू कापडी ते पोहा त्यांचा जव तो ॥ १४ ॥

नाभिस्थ तो वाटसरू सडीया येकला तथा ।
निबर्निंब्बर ह्यातारें माथारें ह्मणिजेतसे ॥ १५ ॥

निष्ठुर तो हीरवट्ट उर्मट्ट असवाळ तो ।
तरुणा तरुणाताठा ताठाडी तरणाच तो ॥ १६ ॥

बाड तो पुष्ट त्यामाजी कटवो ह्मणिजे तथा ।
चोरटा जार चाळ्याळ तीताल ह्मणिजे तया ॥ १७ ॥

कुच्योदय पात्र तो नामें कुचरूही कुनिष्टही ।
कुधान तो कुटिलही दुरळू दुष्ट जाणिजे ॥ १८ ॥

खुनसी दीर्घसूत्री तो बरळू भ्रांत बोलिजे ।
भ्रष्ट जो मार्ग चवला ह्मणिजे तो भरंगळू ॥ १९ ॥

॥ इति वर्ग ॥ ११ ॥ समाप्तः ॥

* * *

## वर्ग बारावा

श्रीगणेशाय नमः ॥ पक्षी-खग-मृगादि वर्ग ॥

च्याम तें चामडें चर्म कातडेंही नपूंसकी ।
मुशा ऐसी निघे साल मोसकें मोकसें तसें ॥ १ ॥

आंगाचें सगळें चर्म शेवडी ह्मणिजे तिये ।
हत्तीचें वछ तो छावा घोड्याचें होय शिंगरूं ॥ २ ॥

वाघ सिंव्ह सुणीं कोल्हीं वानरें मांजरादिकीं ।
वछें ह्मणवती पिल्लीं पिल्लूं तें होय येकट ॥ ३ ॥

हरिणीचें वछ जें कीं तेंचि पाडस बोलिजे ।
चकोरवछें तळगें तळंगें नाम त्यां तथा ॥ ४ ॥

सेळीचें वछ जें तैंची शेरडूं वारिकें तथा ।
मेडीचें वछ जें त्यातें करडूं ह्मणिजेतसे ॥ ५ ॥

घोडा तो नरही अश्व घोडी ते मादनान तें ।
घोडें ह्मणोनियां नाम सामुदाई नपूंसकीं ॥ ६ ॥

उंचाडांचीं असीं नामें अडघोडींच मध्यमें ।
जें गिड्डुं चांग चालीचें तें तो टांकण बोलिजे ॥ ७ ॥

फेंगडें भारवाही तें गिड्डुं तट्टूच बोलिजे ।
घोडीस भरवायाचा घोडा तो ह्मणिजे वळ्हो ॥ ८ ॥

बकरा येडका मेढा वस्तुही ह्मणिजे तया ।
सुणा कूकर कुत्राही कुतरा तीं यथास्वरीं ॥ ९ ॥

वाघ्या तो बालभाषेंत कुत्ताही ह्मणिजेतसे ।
काउळा कावळा काग काकही ह्मणिजे तया ॥ १० ॥

साळंखी आणि साळोंखी साळू सारीहि सारिका ।
रावां पुंसा आणि राघू तोताही ह्मणिजेतसे ॥ ११ ॥

सेळीच्या पुरुषा नांव बोकूड ह्मणिजेतसे ।
मेंडरूं मेंढरूं मेंढ्रूं मेडी ते बकरी कळो ॥ १२ ॥

येकीं बहुत्वीं तो पांख पंखही परपक्षही ।
नपुंसकीं बहुत्वींच पंखें पीछें पिसें तिसें ॥ १३ ॥

येकीं द्विवचनीं पीछ असे पुंल्लिंग जाणिजे ।
पाखरूं तें पाखिरूं तें पुल्लिंगी पक्षि पक्षिया ॥ १४ ॥

यथास्वरीं पारवें तें स्त्रीलिंगीं बोलिजेतसे ।
बहु वाक्यें स्वापदें तें सावजें तें जनावरें ॥ १५ ॥

॥ इति वर्ग ॥ १२ ॥ समाप्तः ॥

* * *

# वर्ग तेरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ भाषाप्रकाशीं जलादिवर्ग आरंभ ॥

निरुंद तेच चिरटी ऐत विस्तार पसरट ।
निरुंद खोल ते बावी द्वयीं बारो विहीर ते ॥ १ ॥

थोडक्यापासुनी पाणी उदंडहि जयामधें ।
कर्नाटकीं कालवा तो पाट देशीय जाणिजे ॥ २ ॥

भरे सरे पाउसानें सवें जो रानकालवा ।
थिरे वदखलीं पाणी वोडा त्याप्रति बोलिजे ॥ ३ ॥

नदी तेच नई होय तिचा विस्तार पात्र तें ।
नदीच्या वोहटी तींत खांटिला विहरा झरा ॥ ४ ॥

पाणी न वाहतां खुंटे ज्यांत कुंटें तडाग तें ।
होंडें हें ह्मणिजे त्यांस सुरंगाचें तटाक जें ॥ ५ ॥

पाण्याच्या घागरी वैलें वाहिल्या मकणी तसी ।
तिमलें तिंबलें आणी चिंबलें भिजलें तसें ॥ ६ ॥

वोलावलेंही ह्मणिजे आणि वोल्हासलें तसें ।
तटाक भरले ठाईं तुंबलेंही तुडुंबलें ॥ ७ ॥

वोसंडलें हिसळलें उसळलेंही उसाळलें ।
उफाळलें उफळलें तें उचंबळलें तसें ॥ ८ ॥

सिंतडा तोच सिंतोडा ठेंद थेंबहि थेंबुटा ।
चिटका सिटका ठिप्का अवुखें तें नपुंसकीं ॥ ९ ॥

नदीनाहो समुद्र तो लहरी आणि लाट ते ।
तरंग आणि हेलावा पुलिंगी बोलिजेतसे ॥ १० ॥

प्रवाहो पूर भरितें लोट तो पाणचालि ते ।
उभडा तो तेंच उकळी तो झरा तोच पाझर ॥ ११ ॥

बाबुळी आणि गोंडाळें तेंच शेवांळ जाणिजे ।
लांबीनें थांबलें पाणी तें तळें सामुदाइकीं ॥ १२ ॥

पाणीयाडें पाणवसें पाण्याचें स्थिर तें स्थळ ।
अपावटी जलाधार निरुंदी खोल आड तो ॥ १३ ॥

कुहा ह्मणुनिही त्यास पुलिंगीं जाणिजेतसे ।
पुलिंगीं कडका कांट कड आणि तडा तट ॥ १४ ॥

पाळीही समुद्राचें ते नदीचा कांठ तीर तो ।
पारही होय पुलिंगीं स्त्रीत्वीं मेर ह्मणोनि घे ॥ १५ ॥

साकुद्वयीं सांगडी तैं पेटी ते ह्मणिजेतसे ।
तें कुशावर्तसें कुंटें जें उत्तळ अपावटी ॥ १६ ॥

ताफा सांगड पुलिंगीं तारूं होय नपूंसकीं ।
पाणतारक जें जें तें तारूं सर्वंहि बोलिजे ॥ १७ ॥

समुद्रमध्यगामी जें थोर तारूं जहाज तें ।
डेरा बुडुख ते डोणी द्रोणाकारहि साजती ॥ १८ ॥

स्त्रीत्वीं समान बुडुखीं होडी नावहि जाणिजे ।
श्रीगाडळें तें कमळें फुल्लारें तें विकासलीं ॥ १९ ॥

रक्तोत्पला प्रतीनाम रातोत्पळ ह्मणोनियां ।
अधांत्र तें अंतराळ नभाचें पोट पोकळी ॥ २० ॥

अभाळ तेंच आशे अब्रुटें ह्मणिजे तया ।
भ्रमरू भंवरू आणी भंवरा भोंवरा तथा ॥ २१ ॥

भोंगाही तोच ह्मणिजे नवरंगहि बोलिजे ।
ढग तो मेघ तो आणी मेहुडें तेंच बोलिजे ॥ २२ ॥

मेघसंघीं मेहुडें तें मेघाडंब्र अभाळ तें ।
मेह पाउस पर्जन्य प्रजन्य वरषू तथा ॥ २३ ॥

धुयी तुषार पाऊस झडीचें नांव वांकडी ।
धारासमूह सरिते फेंस फेकहि फेण तो ॥ २४ ॥

टापु तो बेट तें स्वल्प देशें विस्तार दीप तें ।
वीज वीजू विजवटी ते तो वज्राग्नि जाणिजे ॥ २५ ॥

क्षण प्रभा झळकतां लवली तेथ बोलिजे ।
चिखूल आणि चिखल चिखोल रुतणी रुती ॥ २६ ॥

रचंदा रौंदळी चेंदा चेंदडाही ह्मणूनि घे ।
पातळा चीखला नांवें बरदा बिरटी तथा ॥ २७ ॥

रिबटी दिबिटी राडी रसराडी अबंदर ।
नदीमधील रुतणी चोरवाळू ह्मणूनि घे ॥ २८ ॥

खोल तोचि खोलगट खोल तद्भाव जाणिजे ।
पाणखोली अतिशयें तो डोहो ह्मणिजेतसे ॥ २९ ॥

अह्राचे उतळा नांव तेचि उत्तळ बोलिजे ।
सिंपोटी सिंपुटी सिंपे सिंपोला सिंपुला तथा ॥ ३० ॥

पैलतीराप्रती नांव परपार ह्मणोनियां ।
वोढी वोहडि ते वोढा धारसा पाणवेग तो ॥ ३१ ॥

विहीर डोंगरीची ते तें टाकें ह्मणिजेतसे ।
नावेतें जे चालविते नावाडे ह्मणिजेत ते ॥ ३२ ॥

जला माघारिता दंड अवळी त्यास बोलिजे ।
नावेसी ढकलायांचा वेळु तागा ह्मणूनि घे ॥ ३३ ॥

........ नासें दक्षिणावर्त जाणिजे ।
अव्हावेलहि तैसाच सव्य घेरा तरूवरी ॥ ३४ ॥

मेरूचें नाम हेमाद्र हेमाड गिरराजही ।
आणीक रत्नशिखरी देवालय ह्मणिजे तया ॥ ३५ ॥

हिमालय हिमवंतूही मलयाचल वावनु ।
दुरोणु द्रोणु जाणावा मद्र मंदर जाणिजे ॥ ३६ ॥

कैलासगिरिचें नाम बोलिजे ढवळागिरी ।
वाद्यंत्रें तेंचि वाजंत्रें वाज्या वाजंतरें तुरें ॥ ३७ ॥

वाजंत्रीं तें वाद्यसैंघें सामुदाई निवेदिलीं ।
तुरध्वनीचें आधिक्य तुरबंबाळ बोलिजे ॥ ३८ ॥

वाजंत्र्यांचा गीतनळा गानपूर ह्मणूनि घे ।
जे श्रुती तो नागसर ढोल भोगळ जाणिजे ॥ ३९ ॥

झल्लरी ते झालर ते झांगडें थोर त्यांमधें ।
टकोरा तेच टमकी गिडघीडी ह्मणिजेतसे ॥ ४० ॥

टमक्याहुनिही थोर जोड ऐसा समेळ तो ।
त्याहुनी थोर तो डंका नगारा थोर त्याहुनी ॥ ४१ ॥

भेरी नाम तयाचेंचि समसंस्कृत दुंदुभी।
नऊ वाद्यें जिये आगें तेचि नौबत बोलिजे ॥ ४२ ॥

तुतारा तें तुर्य वाद्य बांका शृंगहि सिंगहीं।
करणा तोच कर्णाही तो मृदंग मृदांगही ॥ ४३ ॥

त्यासीच मादळ असें ह्मणिजे पुं-नपूंसकीं।
केंड तो विरतु तो आणि स्त्रीलिंगीं होय देवता ॥ ४४ ॥

ठिणगी तेच फुणगी आगीचा कणु जाणिजे।
दिव्याची ठिणगी जे ते काजळीफुल बोलिजे ॥ ४५ ॥

सगडी अगिटी तेचि सेकाटी ह्मणिजे धुई।
पेट तो अग्निची पुष्टी भडका जाळ तो तथा ॥ ४६ ॥

॥ इति वर्ग ॥ १३ ॥ समाप्तः ॥

* * *

# वर्ग चौदावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ वनौषधी वर्ग आरंभ ॥

फांपावलें वाहडलें पैसलें धुरवाडलें ।
बाहाळलें पसरलें पसलें वाढलें तसें ॥ १ ॥

विस्तारलेंही ह्मणिजे त्यापरीच उफाडलें ।
उफाळलें उधवलें उफळ्लेंही ह्मणोनि घे ॥ २ ॥

पीकलें तें पणपलें लागलें तगलें तसें ।
उभारलेंही ह्मणिजे वांचलें तेंच जाणिजे ॥ ३ ॥

सुकलें तें हटकलें सोकलें शोखलें तसें ।
वाळलें तें शुष्क तैसें तापलें तातलें तसें ॥ ४ ॥

कर्पलें तें आहळलें रूतलें तें दढावलें ।
वळावलें प्रबळलें तैसेंच बळकावलें ॥ ५ ॥

फळावलेंही फळलें फुललें तें विकासलें ।
फुटलें तेंचि गुरलें आणि आंगोरलें तसें ॥ ६ ॥

पालहेजलें झाड तैसें ह्मणिजे हीरवाळलें ।
कोमेजलेंही कोमेलें आणि कोमाइलें तसें ॥ ७ ॥

वास आणी मगमगी मग्मगाट सुगंधही ।
रस्मसी रसळसी आणी टौटवी ताजकी तथा ॥ ८ ॥

लस्लसी लुस्लुसी ऐसी रुखाची कोंवळीव ते ।
ताजकी कोवळीकेची ह्मणिजे लौलवीतही ॥ ९ ॥

वेलांचे अग्र गुंडाळे कोवळे जे तयांप्रती ।
लुंग लुत्ता असीं नांवें वेली ते वेलविस्तर ॥ १० ॥

गुंफणी वेलमूळाचीं जुंबाडीं जुंप गुंफ ते ।
रोपें नवींच झाडें तें झुडुपें दाट धाकटीं ॥ ११ ॥

रुख थोवे वेगळाले झाडखंडें वनें वनें ।
नपुंसकीं अभुवनें आरण्येंही निरंजनें ॥ १२ ॥

कांट्याचें दाट वन तें कां टवण बोलिजे ।
झाडांची दाटणी जेथें झाडी ते दांग तें तथा ॥ १३ ॥

काष्ठाची सजली काठी दांगें दांगाहि नाम ती।
झाडासी जीवनाधार पाळी तेचि अळें अळा ॥ १४ ॥

दर्वांत सामुदाईक दाफा पाती तथा सळा।
बाह्लिक फांटा ते फोक ते ढाळी तोच डाहाळा ॥ १५ ॥

थोर निभर फांटा तो ते खांदी ह्मणिजेतसे।
पोट ठोसर पोटाळें तें सालीपट सालि ते ॥ १६ ॥

छाया ते साउली साई ढालपी चखरी तथा।
झाडासी बांधला नोंटा पार तो ह्मणिजेतसे ॥ १७ ॥

बुड खाडें मूळ खंडें बुड साळें मुळें मुळया।
मुळाचें नांव आणीक अणियाळें ह्मणोनिही ॥ १८ ॥

कांदे कंद अशा नांवें भक्षणा योग्य तें मुळें।
अणोज मोड अंकूर कोंब तो कोभ तो तथा ॥ १९ ॥

आणीकही तया नांव अणियाळ नपूंसकीं।
वृक्ष तो रुंख तो आणी झाड तें ह्मणिजेतसे ॥ २० ॥

झाडांचा समुदावो तो झाडोरा दाटगीर्द तें।
ते बागशाई ह्मणिजे साइसीं रम्य बाग तो ॥ २१ ॥

थोर वृक्षाप्रती नांव मस्तानहि मसंदही।
वेली ते आणि ताटी ते कुंप तो ह्मणिजेतसे ॥ २२ ॥

संस्कृतीं आम्रराजी ते अंबराई ह्मणोनि घे।
भाजीपाला नागवल्ली याचीं स्थानें मळेच ते ॥ २३ ॥

ह्मणीतल्यां नंदवन जाणिजे फुलबाग तो।
उंसाचें सेत जें त्यासी फडा फडहि बोलिजे ॥ २४ ॥

जेवीं खावीं योग्य पानें पाला पानें समोहिक।
पत्रावळी पात्र येणें पत्रही समसंस्कृत ॥ २५ ॥

अंबयाचा पुष्पसंघ नामें मुहर मोहर।
पुष्प तें फूल ह्मणवे कळी ते मढही ह्मई ॥ २६ ॥

मुंकी कळी होय कची कुवडी पालथी कळी।
फकडी ते फांकही ते अर तें दळ तें तथा ॥ २७ ॥

इत्यादि नांवें पुष्पांच्या पत्रांचीं जाणिजेत हें।
आंगोरे ते अगरडे शेंडेही ह्मणिजेत ते ॥ २८ ॥

डीरी खोल्वीं चिगुर तो नित्येकवचनी असे।
अचळु तो परवत पहाड गिरि डोंगर ॥ २९ ॥

वेलाचें जें घरकुलें ते गुंफा ह्मणवीतसे।
झाड जें घोळसरिचें तेंच भोळसरी कळो ॥ ३० ॥

सुर्पणाचें ( सुपर्णाचें ) झाड तेंची पुन्नागहि कळंवही।
कदंब वृक्ष जे तेही ह्मणवीती कळंबची ॥ ३१ ॥

तमाल तोची तंमाड ताल तो ताड बोलिजे।
पाटलीचा वृक्ष तोची पादरी आणि पाडली ॥ ३२ ॥

सोंदडी ते सवदडी शमी अश्वथ पिंपळ।
मंग्रोळी मंगरोळीही कांडवेलीहि बोलिजे ॥ ३३ ॥

कदळी तरुचें नांव केळी आणीक कर्दळी।
बाह्याचें झाड ते बाहा बाहळी ह्मणिजेतसे ॥ ३४ ॥

नारेळी नारळी तेचि बोरी ते ह्मणिजे ब्री।
जांब पेरू तूपकेळी जंबू जांबळि जांबळी ॥ ३५ ॥

अंब्याचें झाड तो अंबा निंबोळी कडु निंबु तो।
निंब लिंबहि जाणावे गोड साखरनिंबही ॥ ३६ ॥

काळा निंब कढीनिंब लोंच्याचे निंब ते बहु।
काजू खुरासनी चिंचा वट तो वड बोलिजे ॥ ३७ ॥

गोविंद तो ते वाघांटी खैरू खदिर जाणिजे।
कुचली विषमुष्टी ते हिरडा हरडा तथा ॥ ३८ ॥

कांमोणी तेच कांगोणी सेंन्नी ह्मणवि सेंदणी।
सुपली भगवल्ली ते होय धत्तुर धोतरा ॥ ३९ ॥

हराळी दुरवा दूर्वा बिल्व तो बेल जाणिजे।
रुवी तेचि रुई तेची नामें रुचिक पूंसकीं ॥ ४० ॥

तृणाचें नाम गवत तणही ह्मणिजे तया।
गंगावती गंगवती सेर तो सेंड बोलिजे ॥ ४१ ॥

